


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



# महाराष्ट्र साहित्य - पत्रिका

महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक मुखपत्र

जानेवारी १९६३

वर्ष ३५ अंक १४३

संपादक

दि. के. बेडेकर

## अनुक्रम

## महाराष्ट्र साहित्य पत्रिका

# वाङ्मय समालोचन अंक

## ( १९६२ )

येत्या मे महिन्यात प्रसिद्ध होईल

**विषय**

कथा—प्रा. भीमराव कुलकर्णी, पुणे

कविता—प्रा. कृ. ब. निकुंब, बेळगाव

टीका—प्रा. डॉ. गं. ब. ग्रामोपाध्ये, मुंबई

ललितवाङ्मय—प्रा. डॉ. स. गं. मालशे, मुंबई

याशिवाय १९६२ सालात प्रसिद्ध झालेल्या मराठी ग्रंथांची अद्ययावत सूची आणि दोन भारतीय भाषांचे वाङ्मय समालोचनपर लेख.

---

## महाराष्ट्र साहित्य परिषदेची

# नवी प्रकाशने

१. शास्त्रीय परिभाषा कोश — ६·००
संपादक—डॉ. म. वि. आपटे
डॉ. मा. पु. जोशी

२. द्रौपदी स्वयंवर ( अवचितसुत काशीकृत ) — ५·००
संपादक—डॉ. वा. दा. गोखले

३. संतवाङ्मयाची सामाजिक फलश्रुती ( द्वितीयावृत्ती ) — ३·००
लेखक—प्रा. गं. बा. सरदार

अनुक्रमणिका






महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ३५, अंक १४३ : ऑक्टोबर–नोव्हेंबर–डिसेंबर १९६२. संपादक – दि. के. बेडेकर

# संपादकीय

## महर्षींना श्रद्धांजली

आधुनिक भारताच्या इतिहासात समाजसेवा, कार्यनिष्ठा आणि तपस्या या गुणांमुळे ज्यांचे नाव चिरस्मरणीय म्हणून राहील अशा व्यक्तींमध्ये महर्षी अण्णासाहेब कर्वे यांना अढळ स्थान आहे. स्त्रीशिक्षण हे त्यांचे मर्यादित अंगीकृत कार्य होते तरी त्यांचा ध्येयवाद फार व्यापक होता. समता व मानवजातीचे कल्याण ही आधुनिक युगधर्माची मुख्य लक्षणे असून या धर्माचाच प्रत्यक्ष आविष्कार निरनिराळ्या मर्यादित रूपांत होतो. स्त्रीशिक्षण ही अशी मर्यादित गोष्ट असूनही महर्षी कर्वे यांच्या शिक्षणकार्याच्यामागे युगधर्माची महान प्रेरणा होती. यामुळेच महाराष्ट्रात आणि एकंदर भारतातही त्यांना एवढे मोठे मानाचे स्थान लाभले. समकालीन सुशिक्षित जनतेला, व म्हणून लोकाग्रणींनादेखील, सामाजिक परिवर्तनाचा मार्ग पसंत नव्हता, तो भयावहही वाटत होता. दलित जातीत जन्मलेल्या माणसाने आपल्या पायरीने वागावे व प्राप्तकर्तव्य करण्यातच समाधानी राहावे, स्त्रियांनी स्वैपाकघरातच सुखाने नांदावे असे लोकांचे आग्रही मत होते. या मताच्या विरुद्ध बोलणाराही नास्तिक व देशाभिमानशून्य माणूस ठरत होता. महात्मा फुले आणि महर्षी कर्वे यांच्यासारख्यांना तर शिव्याशाप व छळच सहन करावा लागत होता. आज काळ फार पालटला आहे, परंतु त्या काळी खऱ्या सुधारकाला केवढ्या खंबीर मनोधैर्याची व उदात्त ध्येयनिष्ठेची गरज होती याची

अनुक्रमणिका




कल्पनाच केलेली बरी ! अशा सच्या सुधारकांत महर्षींना मानाचे अग्रस्थान द्यावे लागेल.

महर्षी साहित्य परिषदेचे सभासद होते व आपल्या स्वभावधर्माप्रमाणे वार्षिक वर्गणी देण्यासाठी स्वतः नियमितपणे कार्यालयात येत. ज्या शेवटच्या सार्वजनिक समारंभाला ते हजर राहिले तो 'नवे जग' प्रकाशनाचा समारंभ ता. २० ऑक्टोबर १९६२ रोजी परिषदेच्या सभागृहात झाला. ता. ९-११-६२ रोजी, या थोर महात्म्याला शांतपणे मृत्यू आला. महाराष्ट्रातील साहित्यिकांच्या वतीने आम्ही त्यांना श्रद्धाञ्जली अर्पण करतो.

## गोमंतक मराठी साहित्य संमेलन

पोर्तुगीज अमलातून मुक्त झालेल्या गोमंतकात भरलेले पहिले साहित्य संमेलन डिसेम्बर २९ रोजी झाले. त्यापूर्वी येथे दहा संमेलने झाली, परंतु या संमेलनाचे स्वरूपच वेगळे होणे प्राप्त होते. स्वागताध्यक्ष श्री. दा. अ. कारे यांनी आपल्या भाषणात म्हटले की, "गोमंतकीय साहित्यिकांना आपल्या सामुदायिक व्यक्तित्वाची ओळख करून घेऊन आज एक सांस्कृतिक पुनरुज्जीवनाचे कार्य करावयाचे आहे.... सांस्कृतिक पुनरुज्जीवनाची पूर्वतयारी म्हणून साहित्यक्षेत्रातील काही प्राथमिक स्वरूपाची कामे आता निकडीने हाती घेतली पाहिजेत. गोमंतकातील सर्व महालांत ठिकठिकाणी दंतकथा, लोककथा, आख्यायिका, लोकगीते वगैरे जे जे लोकसाहित्य उपलब्ध आहे ते शक्य तितक्या लवकर एकत्र केले पाहिजे. लोकसाहित्याप्रमाणेच जी अत्यंत आस्थेने व चिकाटीने गोळा केली पाहिजेत ती म्हणजे जुनी हस्तलिखिते व इतर ऐतिहासिक साधने. गोमंतकाची आजची एक महत्त्वाची गरज म्हणजे त्याचा एक सर्वांगपरिपूर्ण असा इतिहासग्रंथ." श्री. कारे यांनी म्हटल्याप्रमाणे गोमंतकाचे लोकसाहित्य, तसेच जुन्या व आधुनिक काळात मराठीत व कोकणीत लिहिले गेलेले साहित्य, ऐतिहासिक साधने आणि तेथील चित्रशिल्पादि कला व कारागिरी या सर्वांचे संग्रहीकरण आस्थेने व पद्धतशीरपणे झाले तर गोमंतकीयांना आपल्या सामुदायिक व्यक्तित्वाची व परंपरेची सार्थ ओळख पटेल. या बाबतीत, महाराष्ट्रराज्य आणि येथील साहित्याच्या, ललितकलेच्या व इतिहाससंशोधनाच्या संस्थांचे भरपूर साहाय्य त्यांना मिळेलच.

मराठी व कोकणी यांच्यात तसे द्वैत कधी नव्हतेच व ह्याच भावनेने संमेलनाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी अध्यक्षीय भाषणात असे म्हटले आहे की "कोकणीला साहित्याची प्रतिष्ठा व शिक्षणाचे माध्यम म्हणून स्थान देण्याचा प्रयत्न कोणी केल्यास त्याला विरोध करण्याचे कारण नाही." याच संदर्भात त्यांनी असेही म्हटले आहे की प्रज्ञावंतांनी परिश्रमपूर्वक जिला प्रौढत्व दिले आहे अशा मराठी भाषेचाच आश्रय गोमंतकीयांना करावासा वाटेल हे एक व्यावहारिक सत्य आहे. संमेलनामध्ये गोमंतकाच्या महाराष्ट्र-समावेशाचा ठराव बहुमताने मंजूर झाला याचे कारण या व्यावहारिक सत्याची जाणीव आज गोमंतकीय जनतेला आहे. कोकणीवर त्यांचे अढळ प्रेम आहे. पण ते मराठीलाही आपलीच समजतात हे सत्य आहे.

आज गोमंतक महाराष्ट्रात समाविष्ट होईलच अशा विश्वासाने गोमंतकीय जनतेने पुढील पावले टाकली पाहिजेत व आपसातले मतभेद न वाढविता आपल्या 'सामुदायिक व्यक्तित्वाची' जोपासना व संवर्धन केले पाहिजे. मराठी भाषा व महाराष्ट्राची संस्कृती व परंपरा उदार व सहिष्णू आहे, अहिंदू धर्मीयांनाही प्रेमाने वागविणारी आहे, याची साक्ष आपण सर्वांनी पटवून दिली तर आज दुरभिमानाने फुटीर वृत्तीचा अवलंब करणाऱ्या व्यक्तीदेखील आपल्या सर्वांच्या अंगीकृत कार्यात सहभागी होतील अशा आत्मविश्वासाने आता आपण कामाला लागले पाहिजे. हाच या ऐतिहासिक महत्त्वाच्या संमेलनाचा संदेश आहे.

## वडोद्याची मराठी वाङ्मय परिषद

गोमंतकातील संमेलनाबरोबरच बडोद्याला मराठी वाङ्मय परिषदेचे २६ वे अधिवेशन झाले. तिचे अध्यक्ष प्रा. पु. ग. सहस्त्रबुद्धे यांनी आपल्या भाषणात असे मांडले की कोणताही समाज घेतला तर तेथील सामान्य माणसे व नेते हे कोणत्या तरी तत्त्वज्ञानाचे अनुयायी असतात. त्यामुळे त्या समाजावरील " नेत्यांचे शासन म्हणजे त्यांनी स्वीकारलेल्या तत्त्वज्ञानाचे म्हणजे ते तत्त्वज्ञान प्रतिपादन करणाऱ्या, समाजात ते दृढमूल करणाऱ्या, ते सिद्ध करणाऱ्या ग्रंथांचे शासन असते हे सहज दिसून येईल. " ग्रंथ हेच समाजाचे खरे शासक आहेत हे तत्त्व प्रतिपादन करण्यासाठी प्रा. सहस्त्रबुद्धे यांनी युरोपच्या आधुनिक इतिहासाचे सविस्तर वर्णन केले. त्याचप्रमाणे गीतारहस्य, संस्कृतिसंगम, सत्तावनचे स्वातंत्र्ययुद्ध, आधुनिक भारत यासारख्या आधुनिक मराठी ग्रंथांचाही त्यांनी दाखला दिला.

समाजाला नियमन, प्रेरणा व गती देतील असे ग्रंथ आधुनिक मराठी साहित्यात निर्माण झाले ही अभिमानाची गोष्ट आहे असे सांगून पुढे प्रा. सहस्त्रबुद्धे यांनी असे म्हटले आहे की अशा ग्रंथांची " महान परंपरा लोप पावते की काय अशी दारुण शंका मनाला आज त्रस्त करीत आहे. " हे विवेचन करीत असताना, समाजाला प्रेरणा देणाऱ्या तात्त्विक निबंध-साहित्यरूप ग्रंथांचे महत्त्व प्रा. सहस्त्रबुद्धे यांनी सांगितले; परंतु ललित वाङ्मयाचा " अनादर करावा किंवा उपेक्षा करावी असा मनात मुळीच हेतू नाही " असेही त्यांनी आवर्जून म्हटले. तसेच, युरोपातील " मन्वंतरे थोर ग्रंथकारांनी निर्माण केली आहेत " असे जरी असले तरी " धार्मिक, सामाजिक, आर्थिक, राजकीय अशा सर्व क्षेत्रांतले अनेक घटक क्रान्तीला किंवा उत्पाताला कारण होत असतात " अशी व्यापक भूमिकाही त्यांनी उल्लेखिली आहे.

सामाजिक परिवर्तनाची प्रक्रिया व्यक्ती व समष्टी, विचार व कृती, परंपरा व नवसर्जन अशा अनेक गोष्टींच्या परस्पर-आघातातून घडत जाते. यात ' ग्रंथ ' किंवा तात्त्विक विचार यांना शक्तिमत्त्व आहे. ललित साहित्य आणि चित्रशिल्पादि ललितकला यांनाही जनमानसाला दिशा व आकार देण्याचे सामर्थ्य आहेच. ही दोन्ही सामर्थ्ये स्वयंभू व स्वयंपूर्ण नाहीत आणि ती समाजाच्या इतर सामर्थ्यांशी समवायी आहेत. ह्या व्यापक विचाराचा अव्हेर करून एकांगीपणाने एखाद्या घटकालाच निर्णायक प्रेरकत्व देण्याची चूक पुष्कळदा होते. प्रा. सहस्त्रबुद्धे यांनी त्या एकांगीपणाचा धोका स्पष्ट सांगूनच ' ग्रंथसत्तेचे ' आपले प्रतिपादन केले आहे. मराठी साहित्यातील तात्त्विक निबंधाच्या क्षेत्रातील वाङ्मय जास्त समृद्ध व्हावे ही गोष्ट अध्यक्षीय व्यासपीठावरून इतक्या तळमळीने प्रतिपादन केल्याबद्दल प्रा. सहस्त्रबुद्धे यांचे आभार मानावयास हवेत.

## वृत्तपत्रीय लेखनातील भाषादूषणे

नागपूरचे श्री. आनंदराव जोशी यांनी संपादकांना पाठविलेल्या पत्रात असे म्हटले आहे की ' इंग्रजी अमलात मराठी भाषेचे भ्रष्टीकरण' झाले व तोच प्रकार स्वातंत्र्य-प्राप्तीनंतर चालू आहे. अमुक गोष्टीनंतर मध्यंतरीच्या काळात बऱ्याच घडामोडी घडल्या आहेत. या अर्थी ' पुलाखालून पुष्कळ पाणी गेले आहे ' असा इंग्रजी प्रयोग आहे व एका मोठ्या वृत्तपत्रात तो शब्दशः भाषांतरित प्रयोग वापरण्यात आला आहे हे उदाहरण त्यांनी दिले आहे.

'नक्राश्रू ढाळणे' इत्यादि प्रयोग अशाच तऱ्हेने रूढ झाले आणि याला केवळ वृत्तपत्रीय लेखकच जबाबदार असतात असेही नाही. ' वाघिणीचे दूध ' हा प्रयोग तरी मराठी कोठे आहे ? ' भ्रष्टीकरण ' होत आहे यात शंका नाही, पण त्याचे एक कारण असे आहे की वृत्तपत्रीय लेखन फार जलद व हुकमी पद्धतीने करावे लागते. याहीपेक्षा मोठे कारण असे की काही

कल्पनाच ' नव्या ' असतात, म्हणजे मराठीत त्यांना चपखलपणे व्यक्त करणारे वाक्प्रयोग रूढ नसतात. त्यासाठी इंग्रजी प्रयोग रूढ झालेला असतो तो भाषांतरित करून वापरावा किंवा नवा मराठी प्रयोग तयार करावा ! ही अडचण मराठीलाच नाही तर इंग्रजीसारख्या मातब्बर व लवचीक भाषेलाही पडते. या अडचणीवर मात करावयाची तर नवा परकीय प्रयोग समाविष्ट करून घ्यावयाचा असा भाषिक मुलुखगिरीचा प्रकार इंग्रजी भाषेने अनेक शतके केलेला दिसतो. इंग्रजी अमलापूर्वीच्या मराठीतही कानडी, फारशी इत्यादि भाषांचे पुष्कळसे धन आणलेले दिसते. यात वावगे काय ? आणि भ्रष्टीकरण कोणते ? अर्थात, या समावेशक वृत्तीतही संयम व विवेक हवा हे खरे. त्यासाठी श्री. जोशी यांच्यासारख्या साक्षेपी व चिकित्सक भाषाभिज्ञांनी भाषेला दूषित करणाऱ्या प्रयोगांबद्दल नुसता निषेध व्यक्त न करता त्यांच्या जागी वापरता येतील असे रूढ किंवा नवे मराठी प्रयोग योजून ते वृत्तपत्रीय लेखकांना सुचवीत राहावे. त्यांचा साभार स्वीकार आणि वापर वृत्तपत्रीय लेखक करतीलच.

## अभिरुचीच्या भ्रष्टीकरणाला आळा

अश्लील बाजारी वाङ्मयाच्या प्रसाराला आळा घालून वाङ्मयीन अभिरुचीचे भ्रष्टीकरण थांबविण्याचे कार्य कायद्याच्या दृष्टीने राज्याचे आहे; परंतु या कार्याला सक्रिय मदत करण्याची जबाबदारी साहित्यिकांची आहे; ती अंगावर घेण्याचे ठरवून कामाला सुरुवात झाली व त्याचे प्रत्यक्ष परिणाम झालेले दिसत आहेत. अशा बाजारी साहित्याच्या प्रकाशकांपैकी अनेकांनी या प्रकारच्या प्रकाशनातून अंग काढून घेण्याचे ठरविले व तसे परिषदेच्या नियुक्त समितीला कळविले. काही जणांवर खटले सुरू आहेत. सातारा संमेलनातील या संबंधीचा ठराव हा उपयुक्त होता याचे प्रत्यंतर अशा तऱ्हेने येत आहे. साक्षर जनतेत साहित्यिक अभिरुचीची वाढ होत जाण्यानेच हा प्रश्न सुटेल हे खरे आहे, पण तरीही या अभिरुचीच्या संरक्षणासाठीच अश्लील वाङ्मयाविरुद्ध सरकारला व साहित्यिकांना सतत जागरूक राहावे लागेल असा अनुभव इतर देशांतूनही आलेला आहे. तो जमेत घेऊन सध्या योग्य दिशेने प्रयत्न चालू झाले आहेत ही समाधानाची गोष्ट आहे.

## महामंडळ शुद्धलेखन नियमावली

गेल्या अंकात सर्वसंमत अशी महामंडळाची लेखनपद्धती पत्रिकेत सुरू करावी असे ठरविले गेले, परंतु त्या अंकाच्या छपाईच्या बाबतीत आलेल्या अडचणींमुळे त्या अंकात बरेच इतर दोष राहिले तसाच लेखनपद्धतीचा वापरही सदोषच राहिला. या अंकापासून छपाईच्या बाबत स्थिर अशी चांगली व्यवस्था झालेली आलेली आहे व लेखनपद्धती काटेकोरपणे पाळण्याचा प्रयत्न केला जात आहे. महामंडळाची नियमावली आता छापून तयार झाली असून ती परिषद-कार्यालयाकडून मिळण्याची व्यवस्थाही करण्यात आली आहे.

—०×०—

# केळकरांचा विनोद

— के. ना. वाटवे

## विनोदाची प्राचीन पार्श्वभूमी

आपल्या आवतीभोवती हरघडी आढळणाऱ्या विसंगतीला, अनौचित्याला आणि असंबद्धपणाला पाहून हसावे व त्यायोगे आपले मनोविनोदन करून घ्यावे हा मनुष्य-स्वभाव आहे. या मनुष्यस्वभावाचे प्रतिबिंब आपल्या प्राचीनांतल्या प्राचीन अशा वेद वाङ्मयातही पडले आहे व तेथून ते अभिजात संस्कृत वाङ्मयाच्या विविध शाखांतून प्रसार पावत गेले आहे. तीच गोष्ट महानुभावीय वाङ्मयापासून मोरोपंतांपर्यंतच्या जुन्या मराठीत आढळणाऱ्या विनोदासंबंधी म्हणता येईल. संस्कृतातील विनोद प्रायः विदूषकासंबंधी म्हणून विदूषकी आहे अशी साधारण समजूत रुढ आहे; पण ती चुकीची आहे. मानवाच्या शारीरिक व मानसिक दोषांवर आधारलेला बुद्धिगम्य व उच्च दर्जाचा विनोद संस्कृतात आहे. प्रसंगनिष्ठ, स्वभावनिष्ठ, कल्पनानिष्ठ व शब्दनिष्ठ विनोदाची उत्तम उदाहरणे संस्कृतात आहेत.

महानुभाव-वाङ्मयात विनोदाला 'राळिया' असे नाव आहे आणि श्रीकृष्ण–नारदांच्या भागवतातील कथांच्या आधारे महानुभाव पंडितांनी आपली उच्च व खेळकर विनोद-बुद्धी प्रकट केली आहे. तीच गोष्ट एकनाथ, मुक्तेश्वर, श्रीधर, मोरोपंत इत्यादि आख्यान-कवींबद्दल आहे. त्यांनीही मानवी स्वभावातील स्थायी दोषांवर आधारलेला विनोद आपल्या कथानकातून जागोजागी व्यक्त केला आहे. हीच अर्वाचीन मराठी विनोदाची प्राचीन पार्श्व-भूमी आहे.

## अर्वाचीन विनोदाची सुरुवात

इंग्रजी अमदानीमुळे भारतातील जीवना-मध्ये सर्वंकष परिवर्तन घडले. नवे शिक्षण सुरू होऊन त्यातून नव्या धर्तीचे विद्वान बाहेर पडले. पाश्चात्य वाङ्मयाचा अभ्यास सुरू झाला. नव्या विद्वानांनी पाश्चात्य विनोदी वाङ्मयाचा अभ्यास केला. व्हॉल्टेअर, मोलीअर, मार्क ट्वेन, ॲडिसन, स्विफ्ट, गोल्डस्मिथ, शेक्सपिअर इत्यादि विनोदी लेखकांचे लिखाण अभ्यासिले जाऊ लागले. सामाजिक, धार्मिक व राजकीय क्षेत्रात नवे विद्वान आपले खुले मतप्रदर्शन करू लागले. व्यक्तिस्वातंत्र्याला महत्त्व आले. जुन्या सामाजिक व धार्मिक रूढी बुद्धिप्रामाण्याच्या कसावर घासल्या जाऊ लागल्या. त्यामुळे जुन्या संस्कृत आणि मराठी वाङ्मया-मध्ये जे विषय विनोदात कोणी आणले नव्हते, त्यांवर विनोदी टीका सुरू झाली. मराठी गद्याला संपूर्ण वाव मिळाला व मराठी निबंधांनी जीवनाची सर्व क्षेत्रे व्यापिली. लोकहितवादी, महात्मा फुले, ब्रह्मचारी, विष्णुशास्त्री पंडित इत्यादि लेखक आपली मते अभिनिवेशाने प्रकट करू लागले. त्यात परमतांचा उपहास, उपरोध वगैरे होऊ लागला. या प्रवृत्तीचे उत्तम प्रतिबिंब विष्णुशास्त्री चिपळूणकर व आगरकर यांच्या वाङ्मयात पडले.

परके इंग्रज सरकार, हिंदु धर्मावर उठलेले ख्रिश्चन मिशनरी, इंग्रज सरकारच्या अन्नाने ओशाळे झालेले आपल्यातीलच रावसाहेब–रावबहादुर व अर्धेकच्चे सुधारक हे विष्णु-शास्त्र्यांच्या विनोदी टीकेचे विषय होते. विष्णु-शास्त्र्यांच्या टीकेत उपहास, उपरोध–व तोहो

तीव्र स्वरूपात–व्यक्त झाला. आगरकरांचेही सामान्यतः असेच होते. फक्त ते सनातन्यांचा उपहास करीत एवढेच काय ते. पण विनोदाचे खरे प्रातिनिधिक स्वरूप अद्याप व्यक्त व्हावयाचे होते; व ते १८९२ च्या सुमारास श्री. कृ. कोल्हटकर यांनी निर्माण केलेल्या वाङ्मयात प्रकट झाले.

### विनोदयुगाचे प्रवर्तनकार

खुद्द तात्यासाहेब केळकरांनीच कोल्हटकरांना 'विनोदयुगाचे प्रवर्तनकार' ही पदवी बहाल केली आहे. आपल्या 'साहित्य बत्तिशी'त कोल्हटकरांनी सलग विनोद लिहिलेला असून त्यातून जुन्या रूढींवर तिखट हल्ले केलेले होते. त्यांत कोट्या, विनोद, स्वभावनिष्ठ व प्रसंगनिष्ठ इत्यादि विनोदाचे सर्व प्रकार आलेले होते. तसेच कोल्हटकरांनी आपल्या नाटकांतूनही वरील प्रकारचा विनोद उत्तम प्रकारे प्रकट केला आहे. यापूर्वीचा विनोद गंभीर लिखाणात मध्येच कोठेतरी तुरळक तुरळक यावयाचा; पण कोल्हटकरांनी सलग आणि धाराप्रवाही विनोद लिहून मराठी विनोदाचे एक नवीनच युग प्रवर्तित केले. कोल्हटकरांचा विनोद बहुतांशी सामाजिक सुधारणेचा प्रचार करण्यासाठीच निर्माण झाला होता व थोडा कलाविलासात्मकही होता. केळकर हे कोल्हटकरांचे समानशील स्नेही, त्यांच्यासारख्याच उपजत विनोदबुद्धीचे गृहस्थ व हौशी लेखक. त्यामुळे त्यांच्याही विनोदाला याच सुमारास–म्हणजे १८९८ साली–सुरुवात झाली.

### केळकरांचे व्यक्तिमत्त्व

विनोदी लेखकाचा विनोद त्याच्या व्यक्तिमत्त्वानुरूप असतो. तात्यासाहेब हे एक सदभिरुचिसंपन्न गृहस्थ होते. त्यांची न्यायबुद्धी इतकी जागृत होती की ते शत्रूचे गुण व मित्राचे दोषही पाहत. ते वृत्तीने खेळकर, दिलदार, समतोल व सरळ होते. सहृदयता, संयम आणि औचित्य हे त्यांच्या स्वभावाचे स्थायीभाव होते. त्यामुळे त्यांनी लिहिलेल्या विनोदात त्यांच्या वृत्तीचे उत्तम प्रतिबिंब पडलेले आढळते. त्यांच्या विनोदात उच्छृंखलपणा, अश्लीलता, ग्राम्यता, तिखट व्यक्तिद्वेष, खुनशीपणा व अतिशयोक्ती या गोष्टी प्रायः आढळत नाहीत. त्यांच्याच समकालीन काही मंडळींचा विनोद मात्र निराळ्या प्रकारचा झाला. श्री. कृ. कोल्हटकर, शिवरामपंत परांजपे, अ. ब. कोल्हटकर, कृ. प्र. खाडिलकर इत्यादि मंडळी विशेषतः उपरोधात्मक लिहिणारी होती. कारण प्रतिपक्षाला चावे घेऊन त्याला कायमचा जायबंदी करणे ही या लेखकांची विशेषतः शिवरामपंतांची वृत्ती होती. त्यामुळे त्यांचा विनोद लागट असे. ते प्रतिपक्षाची पारध करीत. विनोदाचा उद्देश जायबंदी करणे (To kill) किंवा त्यास टीकेने सुधारणे (To cure) असा असतो. पण इतर मंडळी बहुधा पहिल्याच प्रकारचा विनोद करीत. कारण त्यांची प्रतिपक्षाबद्दलची वृत्ती तात्यासाहेबांप्रमाणे उदार नसे. ते प्रतिपक्षास क्षुद्र समजत. तात्यासाहेब केळकर व इतर मंडळी यांच्यातील विनोदाच्या फरकाचे हे मुख्य बीज आहे. केळकरांच्या विशिष्ट मनोवृत्तीनुरूप त्यांनी केलेला विनोद कशा प्रकारचा झाला हे आता पाहावयाचे.

### केळकरांच्या विनोदाची काही वैशिष्ट्ये

केळकरांच्या विनोदाचे पहिले वैशिष्ट्य असे आहे की, त्यांनी विनोदासाठी विनोद, व तोही सलग, असा कधीच लिहिला नाही. गांभीर्याचे एक अस्तर म्हणून त्यांनी विनोद केला. या अर्थाने केळकर हे विनोदी लेखक नसून ते विनोदगर्भ लिहीत असेच म्हणावे लागते. त्यांचा विनोद नेहमी सहानुभूतिपूर्ण व खेळकर आहे. ते विनोदाच्या कोणत्याही संप्रदायांतले नव्हते; व त्यांनी आपला असा विनोदी संप्रदाय निर्माणही केला नाही. जी घटना पुढे येईल तिच्यातील विसंगतपणा नेमका हेरून त्याच्यावर खेळकर पद्धतीने विनोद करणे हे केळकरांचे वैशिष्ट्य होते. त्यांचा विनोद प्रचारासाठी नसून तो कलाविलासात्मक होता असे म्हणता येईल.

## मेघाची रुपेरी कड

१८९६ मध्ये केळकर टिळकांना येऊन मिळाले व तेव्हापासून त्यांचे लेखन छपाव्याने चालू झाले. योगायोग असा आहे की, केळकरांचे वाङ्मयातील पहिले पाऊल विनोदी प्रांतातच पडले. १८९८ साली त्यांनी शेरिडनच्या ' Rivals 'चे ' नवरदेवाची जोडगोळी ' हे भाषांतर प्रसिद्ध केले. या भाषांतरावरून केळकरांच्या ठिकाणची विनोदाची आवड दिसली, पण स्वतंत्र विनोदनिर्मितीची पात्रता मात्र दिसली नाही. यानंतरच्या काळात अगदी अखेर अखेर पावेतो ५० वर्षेपर्यंत-- त्यांनी अफाट वाङ्मय निर्माण केले. एखाद्या सम्राटाच्या प्रभुत्वाखाली जसे अनेक प्रांत असतात, तसे या साहित्यसम्राटाने वाङ्मयाच्या अनेक प्रांतांवर प्रभुत्व मिळविले होते. कादंबरी, नाटक, गंभीर निबंध, ललित निबंध, लघुकथा, काव्य, टीकालेखन, प्रवासलेख, बातमीपत्रे, चरित्रे, आत्मचरित्रे, राजकारण, इतिहास, तत्त्वज्ञान इत्यादि प्रांतांत तात्यासाहेबांची भरीव कामगिरी आहे. हे सर्व वाङ्मय प्रकृतितः गंभीर आहे. त्यात अनेक प्रसंगी वादाची खडाजंगी व प्रतिपक्षावर केलेले हल्लेही आहेत. पण प्रसंग कोणताही असो व वाङ्मयप्रकार कुठलाही असो, त्यात मधूनमधून तात्यासाहेबांची उपजत विनोदबुद्धी चमकली नाही असे क्वचितच घडले आहे. म्हणून तात्यासाहेबांच्या या अवाढव्य, गंभीर वाङ्मयमेघाला विनोदाच्या मनोहर रुपेरी कडा असत असे म्हणावेसे वाटते.

## कोटी की विनोद !

वर सांगितल्याप्रमाणे तात्यासाहेबांच्या लिखाणात मधूनमधून विनोद चमके. पण त्या विनोदाची जात कोटीची ( wit ) असे. तात्यासाहेबांची बुद्धिमत्ता तीव्र आणि बहुश्रुतताही मोठी आणि भावनेचा पगडा त्यांच्या मनावर कमी. त्यामुळे त्यांच्या ठिकाणची विनोदबुद्धी कोटीचे रूप घेई. त्यामुळे त्यांचा बहुतेक सर्व विनोद शब्दनिष्ठ व कल्पनानिष्ठ झाला आहे. जुन्या संस्कृतज्ञाप्रमाणे शब्दांवर कोट्या करणे, उत्तम तऱ्हेच्या विनोदी उपमा व दृष्टान्त वापरणे व एखादी चमकदार, विसंगत कल्पना घेऊन ती सजविणे असे त्यांच्या विनोदाचे स्वरूप असे. विस्तारभयास्तव प्रत्येकाची उदाहरणे येथे देता येत नाहीत. फक्त दोनच येथे देतो. टिळकचरित्रात तात्यासाहेब लिहितात—' टिळक आणि भाऊशास्त्री यांच्या वादाच्या नाटकाचा आरंभ चंची आणि अडकित्ता या नटी-सूत्रधार-प्रवेशानेच होई.' महाकाव्याजवळ बसविलेले सुंदर पण छोटे सुभाषित विस्ताराच्या अल्पत्वामुळे संकोचेल हे सांगताना केळकर म्हणतात, ' कोहिनूरशेजारी बसविलेल्या हिरकणीस तुझे वजन किती कॅरेट ! म्हणून विचारले तर तिच्या गालावर लाजेची लाली येईल ! ' या समर्पक दृष्टान्तात काव्यही आहे आणि विनोदही आहे.

तात्यासाहेबांचा विनोद किंवा कोटी ऐकून सुसंस्कृत व सुशिक्षित श्रोत्यांच्या तोंडावर कौतुकाचे मृदु स्मित झळके व ते प्रसन्न होत. पण त्यांच्या विनोदाने कोणी खोखो हसून त्यांची हसता हसता मुरकुंडी वळल्याचे कोणाच्या पाहण्यात नाही. याचे कारण केळकरांचा विनोद बुद्धिगम्य, अनुच्छृंखल व संयमित असे हे होय. आश्चर्यकारक व बेफाट विसंगती दाखविणे हे त्यांना जमले तरी नाही किंवा मानवले तरी नाही.

## विनोदी प्रतिभा मर्यादितच

तात्यासाहेबांनी सलग विनोद फारसा लिहिलेलाच नाही; व जो थोडा लिहिला आहे तो फारसा वरच्या दर्जाचा नाही. त्यांना स्वभावनिष्ठ व प्रसंगनिष्ठ विनोद फारसा साधला नाही. तात्यासाहेबांच्या ठिकाणी काव्य व विनोद यांच्या निर्मितीची शक्ती

उपजत होती हे खरे; पण ती मर्यादित होती. जेवणाच्या पंक्तीत एखादा श्लोक सुरात म्हण-णाऱ्याला किंवा फिरावयाच्या वेळी एखादी गोड तान मारणाऱ्याला जसे मैफल रंगविता येतेच असे नाही, तसे मधूनमधून काव्य आणि विनोद पेरीत जाणाऱ्या केळकरांना स्वतंत्र काव्यनिर्मिती आणि विनोदनिर्मिती करता आली नाही, ही गोष्ट त्यांच्या 'पद्यगुच्छ' आणि 'गीताराव', 'माझी आगगाडी कशी चुकली', 'शृगाल-संमेलन', 'दुर्जनसिंग महाराजांनी फेडलेला नवस' इत्यादि सलग विनोदी प्रकरणांवरून सिद्ध होते.

केळकरांच्या ठिकाणी गडकऱ्यांची तर राहोच, पण कोल्हटकरांचीही प्रतिभा नव्हती. ती तशी असती, तर केळकरांनी आपल्या नाटकांत येणाऱ्या विनोदी प्रसंगांत आपली कल्पनाशक्ती प्रकट करण्याची संधी दवडली नसती. 'कृष्णार्जुनयुद्ध' या नाटकात दारुड्या चित्ररथाची बडबड आहे, पण तिला 'एकच प्याल्या'तील दारुड्यांच्या काव्यमय बडबडीची सर नाही. तसेच, याच नाटकात चित्ररथा-बरोबर जुलुमाने सती जाणाऱ्या अप्सरा आहेत, 'चंद्रगुप्ता'त स्त्रीवेषात हरनंद आहे आणि 'वीरविडंबना'त भित्रा उत्तर आहे. या सर्व ठिकाणी थोडा थोडा विनोद आहे; परंतु त्यात कोल्हटकर-गडकरी-विनोदाची चमक नाही. आणि तेथील प्रसंगाच्या अंगप्रत्यं-गातील विसंगती फुलवीत राहण्याचा दमदार-पणाही नाही.

### उपरोधही बेताचाच

'शृगालसंमेलन' किंवा 'दुर्जनसिंगाचा नवस' इत्यादि कथांतून केळकरांच्या ठिकाणी शिवरामपंतांची वक्रोक्ति-व्याजोक्तीची शक्ती होती असे दिसते. पण येथेही शिवराम-पंतांच्या अव्वल दर्जाच्या काव्यमय वक्रोक्तीचा आढळ होत नाही. कोणत्याच विषयांत संपूर्ण प्रावीण्य नाही, पण अनेक विषयांत चांगली गती मात्र आहे, अशी केळकरांच्या वाङ्मय-निर्मितीची स्थिती आहे. त्यांच्याइतका सर्वस्पर्शी वाङ्मयलेखक आढळणार नाही; पण एक निबंधाचे क्षेत्र सोडले तर त्यांनी कोणत्याही क्षेत्रात यशाचो परिसीमा गाठलेली दिसत नाही.

केळकरांचा स्वभाव भावनाप्रधान नसल्याने कोणत्याच बाबतीत त्यांची चित्तवृत्ती उत्कट होत नसे. त्यामुळे आपल्या विनोदी वृत्तीचा वापरही ते संयमाने व समतोलपणाने करीत. इतर काही विनोदी लेखकांप्रमाणे त्यांना विनोदाची नशा कधीच चढत नसे. केळ-करांनी हास्य निर्माण करण्यासाठी स्वतःला हास्यास्पद कधीच बनविले नाही. केळकर विनोद करतानासुद्धा आपले गांभीर्य, आपला दर्जा व आपली प्रौढता कधीही सोडीत नसत. केळकरांच्या आवतीभोवती सनातनी आणि सुधारक यांचे एकमेकांवरील हल्ले-प्रति-हल्ले चालू असता केळकरांनी त्यांतील कोठला तरी एक पक्ष घेऊन विनोदाच्या साहाय्याने प्रचार केला नाही. त्यांचा विनोद प्रचारकी नसून कलाविलासात्मक व खेळकर असे. केळकरांनी आपल्या उच्च विनोदबुद्धीने विनोदाला वाङ्मयात मानाची जागा मिळवून दिली. 'टवाळा आवडे विनोद' हे रामदासांचे जुने वचन असिद्ध ठरविले; आणि महाराष्ट्राला एक विनोदी दृष्टी दिली. 'मी महाराष्ट्राला हसावयास शिकविले' असे आचार्य अत्रे म्हणतात. ते ठीक आहे. पण त्यांच्यापूर्वी हसणे आणि हसविणे ह्या गोष्टी संभावित-पणाच्या आहेत असे स्वतःच्या उदाहरणाने केळकरांनी सिद्ध केले होते ही गोष्ट विसरून चालणार नाही.

विनोदी क्षेत्रातील केळकरांच्या काम-गिरीचा एक महत्त्वाचा भाग निर्देशिला पाहिजे आणि तो म्हणजे विनोदाचे तत्त्व-ज्ञान आणि शास्त्र सांगण्याचा. गडकरी

अव्वल दर्जाचे विनोदी लेखक असूनही त्यांनी विनोदाचे शास्त्र सांगितल्याचा कोठे आढळ होत नाही. कोल्हटकरांनीही ही विनोद-चर्चा त्रोटकच केली आहे. पण तात्यासाहेबांची या क्षेत्रातील कामगिरी अत्यंत भरीव आहे. १९०४ मध्ये 'सुभाषित आणि विनोद' हे पुस्तक लिहून त्यांनी विनोदाच्या तात्त्विक चर्चेला आरंभ करून दिला; आणि १९३७ साली 'हास्यविनोदमीमांसा' हा साडेपाचशे पानांचा ग्रंथ लिहून मराठी वाङ्मयात विनोदाच्या तात्त्विक चर्चेची महत्त्वाची भर घातली. हा ग्रंथ बव्हंशी संकलनात्मक आणि कोशरूप आहे. तरी त्यात तात्यासाहेबांची एक महत्त्वाची भर आहे. विसंगतीतून हास्यनिर्मिती होते असे आपण म्हणतो; पण सुसंगतीचा प्रांत संपतो कोठे व विसंगतीला आरंभ होतो कोठे हे सांगणे कठीण आहे. या मर्यादा त्यांनी 'हास्याची प्रक्रिया' या प्रकरणात पृष्ठ १४९ वर (आवृत्ती १ ली) आकृती काढून स्पष्ट केल्या आहेत. या ग्रंथातील त्यांच्या भरीव कामगिरीमुळे तात्यासाहेबांना विनोदाचे शास्त्र व त्याने प्रयोग या दोन्ही क्षेत्रांत निष्णात असणारे सव्यसाची लेखक असे म्हणावेसे वाटते.

# केच्यांची कविता

— द. भि. कुलकर्णी

'दिंडी गेली पुढे' (१९५९) आणि 'पुनवेचा थेंब' (१९६१) हे मधुकर केच्यांचे दोन काव्यसंग्रह. पहिला संग्रह आकाराने अगदीच लहान. पण या लहान संग्रहानेच केच्यांबद्दल मोठ्या अपेक्षा निर्माण केल्या. आणि दुसऱ्या संग्रहाने त्या पूर्णही केल्या—शेवटच्या काही कवितांचा अपवाद सोडून.

केच्यांनी आपले लक्ष वेधून घेतले ते त्यांच्या साधेपणाने. पाडगावकरांच्या अनुकरणाने झगझगीत कवितांना ऊत आला होता. अशा वेळी—

माझ्या समोर सागर
त्याशी आकाश टेकले ,
झाली असती त्रिवेणी
माझे घर आड आले

—अशा 'साध्या' ओळी लिहिणाऱ्या कवीचे आपल्याला स्वाभाविकच कौतुक वाटले. रंगरंगोटी करून खिडकीत ताटकळणारे चेहरे पाहून आपण विटलो होतो. स्वतःची व वाचकाची आगंतुक आठवण न ठेवणारी कविता आपल्याला हवी होती. केच्यांनी तशी कविता दिली. न नटता मुरडता ती उभी होती. हिच्यात चार जणींपेक्षा जास्त काही असावे असे वाटले; व ते खरेच होते. पण थोडे अधिक जवळ गेल्यावर दिसले की तिची साधी तऱ्हा थोडी फसवी आहे— चांगल्या अर्थाने :

झालो मी येयला
माडाचा सोयरा
पटली सागरा खूण माझी
रक्ताच्या नात्याने
उमाळली लाट

—येथपर्यंत सारे साधे वाटते. पण 'पुळणीचा काठ ओला झाला' असे कवीने म्हटल्याबरोबर आपण दचकतो. 'लाट उमाळली' ती सागराची की कवीची ? मग

कवी व सागर यांचे अद्वैत जाणवते आणि 'झालो मी येथला' या शब्दांना वेगळेच वजन येते.

'पाहून सागर' कवी जळाशी जळ झुंजवाया शिकला हे आपल्याला सहज कळते. पण—

न लागे डावास
कुणी तिन्हाईत
लाटेवरी मात  लाट करी

—याचा संदर्भ कवीकडे घ्यावा की सागराकडे हे चटकन कळत नाही.... केचे दिसतात तेवढे साधे नाहीत ते अशा वेळी जाणवते. आणि पुढच्याच कडव्यात—

आपुल्यापासून
आपुल्याशी धावा
ऐसा हेलकावा  **चैतन्याचा**

—असे ते म्हणतात तेव्हा तर शेवटच्या शब्दाने कवितेला नवेच परिमाण प्राप्त होते.

इंदिराबाईंचे यश पाहून बऱ्याच नवीन कवींनी, व विशेषतः कवयित्रींनी, आपल्या खासगी (व बहुधा काल्पनिक) दुःखाचे सार्वजनिक प्रदर्शन सुरू केले. त्यांच्या उसाश्यांनी, हुंदक्यांनी, आसवांनी आणि जागरणांनी रसिकाला अगदी वैतागून सोडले. प्रामाणिक भावनेचा अतिरेकसुद्धा त्रासदायक वाटतो. मग अनुभूतिशून्यतेतून जन्माला आलेल्या या हळवेपणाला काय म्हणावे! केच्यांनी 'प्रेमकाव्य' असे लिहिलेच नाही. अलौकिकाच्या प्रेमाचे जे काव्य लिहिले तेही सौम्य, संयत. त्यांच्या काव्यात केवळ तृप्तीचीच भावना असती तर या संयमाचे अप्रूप वाटले नसते. अनुभवानेच ही मर्यादा पडली असे म्हटले असते. पण तसे नाही.

एक रंग झेलू बाई
दोन रंग झेलू
श्रीरंगाचि झेलताना
देह कसा तोलू!

—हा आनंद ते जितक्या सहजपणे सांगून जातात तितक्याच सहजपणे—

जेव्हा कळले संतांच्या
वेदनेचा वेद झाला
माझ्या जात्यातला जीव
पीठ होऊन हासला

—असा आपला वेदनानुभवही ते सहज सांगून जातात.

भक्ताला अशी निर्भय वृत्ती हवीच. पण कलावंतालाही आपल्या भावभावनांचे कौतुक करून भागत नाही. अनुभवात खोल खोल बुडूनही त्यापासून अलिप्त राहण्याची, सामान्यांना खरी न वाटणारी, किमया त्याच्या जवळ असावी लागते. केच्यांच्याजवळ ती आहे. त्यांच्या कवितेतील साधेपणा, सौम्यता आणि सहजता या किमयेतून जन्माला आली आहे.

त्याचे आणखी एक कारण असे असावे की त्यांच्या आंतरिक श्रद्धेमुळे जीवनविषयक काही मूलभूत प्रश्न त्यांच्याबाबतीत उत्पन्नच होत नाहीत. प्रश्नांबरोबर येणाऱ्या आत्यंतिक वेदना नाहीत अन् उत्तरांसह येणारा आत्यंतिक हर्षही नाही. 'सत्यासत्यासी मन केले ग्वाही' असे म्हणून तुकाराम अंधारातून चालत गेला; त्याने कुठलीही गोष्ट गृहीत धरली नाही, त्याने शून्यातून श्रेय उभे केले. केच्यांचे तसे नाही. संतांनी त्यांच्यासाठी आधीच श्रेय शोधून ठेवले होते! खरोखर केच्यांचे 'काव्य' संतकाव्यापेक्षा फार वेगळे आहे ते इथे. परंतु केच्यांनी संतांची जीवनमूल्ये स्वीकारल्यामुळे ते वरवर तरी संतवळणाचे वाटते. अर्वाचीन जीवनमूल्ये नाहीत, अर्वाचिन जीवनाचे संस्कार नाहीत परंतु अर्वाचीन काव्याचे, नवकाव्याचे वाङ्मयीन संस्कार मात्र विपुल—त्यामुळे केचे नवीनही वाटतात. अर्वाचीन मराठी काव्यातील एक मोठे आवर्तन संपल्याची ही खूण आहे. व्यक्ति-स्वातंत्र्य, बुद्धिवाद, भौतिकनिष्ठा आणि

मानवतावाद ही अर्वाचीन मूल्ये स्वीकारून केशवसुतांनी नवे काव्य लिहिले. या मूल्यांपायी त्यांनी सामाजिक जीवनात संघर्ष व व्यक्तिगत जीवनात दुःख भोगले. हीच मूल्ये स्वीकारून माधवजूलियन पुढे गेले तेव्हा त्यांना सामाजिक जीवनात दुःखच भोगावे लागले. आणि हीच मूल्ये घेऊन मर्ढेकर जेव्हा अधिक खोलात उतरले तेव्हा जीवनही नाही व मूल्येही अशी त्यांची भयावह अवस्था झाली. डेकार्टच्या Cogito ergo sum चे रूपांतर अपरिहार्यपणे ह्यूमच्या संशयवादात व्हावे तसे हे झाले. मर्ढेकर दुसरे केशवसुत नव्हेत, शेवटचे केशवसुत. आता पुन्हा पहिल्यापासून सुरवात होणे शक्य नव्हते.'जुने जाऊ द्या मरणालागुनि' असे म्हणून खरोखरच नवे, नव्या पातळीवरचे आवर्तन सुरू होणे अपरिहार्य होते. चित्रे, ग्रेस, केचे यांनी तेच केले. जुनी आध्यात्मिक मूल्ये व नवी वास्तववादी मूल्ये निरुपयोगी वाटल्यामुळे चित्र्यांच्या चिंतनशीलतेने एक स्वतःची 'आंतरिक वास्तवता' निर्माण केली--अगदी रिल्कसारखी; ग्रेसने आपल्या भावजीवनातून, वास्तवाशी कार्यकारणभावाने निगडित नसलेली, स्वयंभू अशी भावलयपूर्ण 'केवल कविता' लिहिली आणि केच्यांनी वारकरीपंथ व रामकृष्णआश्रम यांच्यातून जुनी आध्यात्मिक मूल्ये त्यांच्या रक्तात भिनली असल्यामुळे, अध्यात्मप्रधान नवकविता लिहिली. नवकविता. 'झेप'सारख्या एखाद्या कवितेचा तोंडवळा कुसुमाग्रजी असेल, 'ग्रेंच'मधील अखेरच्या दोनचार कवितांवर करंदीकर–पाडगावकरांची फिकी सावली पडली असेल; पण हा अपवाद. त्यांची प्रकृती वेगळीच आहे, आणि ठणठणीतही. अनिल आणि मर्ढेकर या दोन नवकवींना केच्यांनी आत्मसात केले आहे. मराठी कवितेच्या भाषेला मर्ढेकरांनी जसे वाकविले तसे आधुनिक काळी दुसऱ्या कुणीही नाही. त्यांच्या लकबांना डावलून कुणालाही पुढे जाता येत नाही. त्या लकबांकडे बापट–पाडगावकरांसारखी पाठ फिरवण्यापेक्षा त्यांना व्यक्तित्वात पुरेपूर मुरवून घेणे उत्तम. चित्र्यांप्रमाणे केच्यांनीही तेच केले.

अनिलांशी तर केच्यांचे वृत्तिसाम्य. अंतर्मुखता व बहिर्मुखता यांच्या सीमेवरील दोघांचा स्वभाव श्रद्धाशील, दोघेही वऱ्हाडी, दोघांच्याही कवितेत जुने मराठी अन् वऱ्हाडी शब्द, दोघांच्याही कवितेत मंद गेयता, दोघांचीही कविता खास मराठी वळणी....ही साम्यस्थळे आणखी कितीतरी देता येतील. पण गंमत ही की केच्यांनी जाणिवेने अनिलांचा मागोवा कुठेही घेतला नाही.

'ग्रेंबाचिये ओठी', 'देणगी', 'वारीपेरी' अशा कवितांत मात्र मर्ढेकरांची छबी स्वतः कवीलाही दिसली असेल. 'भाव तैसा घाव', 'सुंदर ते ध्यान आले तसे गेले', 'पवित्र तो भास पावन तो क्षण' हे संतांच्या उक्तींचे विकार खरे; पण ही लकब मर्ढेकरीच. शब्दांची भावशक्ती वाढविण्यासाठी व संतांच्या अनुभवशस्त्राने आपल्या अनुभवाचा उभा छेद काढण्यासाठी मर्ढेकरांनी ही लकब वापरली — केच्यांनीही 'देऊळला', 'मृदंगले', 'मेघावले' असे नामधातू, 'कळीकळीतून', 'शतकाशतकांपासून', 'कोणाकोणाशी' असे निर्देश पदाची असंख्यता सुचविणारे अभ्यस्त शब्द, 'वेदनेचा वेद', 'आवरता आवरेना', 'उकिरड्याला उबवीन' असे अर्थ व लय यांची निरगाठ मारणारे अनुप्रास--हेही मर्ढेकरांचेच ऋण.

केच्यांची पापकल्पनाही अशीच मर्ढेकरांना जवळची आहे. मर्ढेकरांच्या काव्यात या पापकल्पनेला एवढे महत्त्व आहे की तिचा स्वतंत्र अभ्यास व्हावा. त्यांच्या पातकाचे क्रिस्टल झाले आहेत, त्यांच्या पापांची वाळून वातड खापरे झाली आहेत, मनातील किती पापे त्यानी रस्त्यांवर केली आहेत—थोडक्यात

मर्ढेकरांनी आपल्या पापांचे, चांगल्या अर्थाने भांडवल केले आहे. केचेही ' अगा नवल! माझेही पाप पुन्हा सोकावले', 'माझ्या मजपाशी पापपुण्य राशी', 'तैशी माझी पापपुण्ये बारा महिन्यांच्या नावे' असे पापाचे भांडवल करतात. 'पळोनिया गेली झोप। होते पाप आड ते॥', ' माता त्याची लाज लावा पापी' असे म्हणणाऱ्या तुकारामाची पापकल्पना अर्थातच फार वेगळी आहे; भारतीय आहे...केच्यांची कविता किंचित अभारतीय अथवा आधुनिक आहे ती इथे.

केच्यांची अध्यात्मनिष्ठा, प्रणयपराङ्मुखता, विठ्ठलप्रेम, अभंग-ओवी छंद यामुळे संत-काव्याशी त्यांच्या कवितेचे नाते जोडले जाते. पण ते उघडच फसवे आहे. संतांची जीवनमूल्ये केच्यांनी घेतली आहेत यात शंकाच नाही. पण संतकाळात ती जीवनमूल्ये समाजाचीच होती; आज ती तशी उरली नाहीत. संत कवी आपल्या समाजाची, काळाचीच मूल्ये व्यक्त करीत होते. त्यामुळे त्यांची कविता आत्मनिष्ठ असूनही सामूहिक मनाचे आविष्करण करणारी ठरली. ही समूह-निष्ठा या आधुनिक काळी केच्यांच्या काव्यात कशी यावी ?

संत कविता लिहीत होते, आपल्या लेख-नाला काव्य म्हणत होते. पण कविता लिहिणे हाही त्यांच्या संतत्वाचाच भाग होता. एका विशिष्ट भाषेच्या काव्यपरंपरेत आपले लेखन बसणार आहे अशी जाणीव त्यांच्यापैकी एखाद्यालाच असेल. त्यामुळे समूहमनाला वाचा फोडणारी असूनही, 'कविता' ही त्यांची खाजगी बाब ठरली. त्यांच्यातर्फे तरी त्यांनी आपल्या कवितेला कालसापेक्ष, वाङ्मयसापेक्ष परिमाण दिले नाही. उलट, एका विशिष्ट आधुनिक परंपरेत आपले काव्य बसणार आहे याची अपरिहार्य जाणीव केच्यांना आहे.

तीव्र भावनेमुळे की काय नामदेव – तुका-राम यांचे अभंग रचनादृष्ट्या सैल झाले. तुकारामाने मराठीला अनेक म्हणी दिल्या व त्याचे कारण त्याच्या शब्दयोजनेतील नेमके-पणा असे सांगितले जाते. ते अगदी खरे आहे. पण हा रेखीवपणा शब्दांच्या बांधणी-तला नसून अर्थाच्या व्यक्तीकरणातला आहे. उलट केच्यांची शब्दबांधणी नेहमीच बांधेसूद असते. अभंग–ओवी हे जुने मुक्तछंदच. केच्यांचे अभंग–ओवी मात्र कोरीव–कातीव आहेत. कोरीवकातीवपणाचेही किती प्रकार असतात: अभिजातवादाचे संस्कार, शब्दां-वरील हुकमतीबाबत आत्मविश्वास, पूर्व-नियोजित आशय व डौलदारपणाचे आकर्षण अशा काही कारणांमुळे कुसुमाग्रजांची कविता कोरीव होते. तर आशयाचा अनेक पदरी पीळदारपणा, भाषेची पुनर्घटना करण्याचे सामर्थ्य व वाचकाच्या रसिकतेवरील विश्वास यामुळे मर्ढेकरांची कविता कातीव वाटते. केच्यांमध्ये या दोनही प्रकारांचे मिश्रण आहे. त्यांच्यापाशी अनेक पदरी आशय आहे. डौलदारपणाचेही त्यांना आकर्षण असावे. सौम्य भावना आणि 'कल्पकता' यांनीही त्यांच्या रेखीवपणाला साह्य केले आहेच.

ओवी – अभंगासारख्या शिथिल छंदातही अक्षरसंख्या नियमित ठेवून आणि क्वचित अक्षरसंख्येचे नियमित गट पाडून केचे आपल्या कवितेचे रूप अधिक रेखीव करतात :

अ. नाठाळ । निसर्गा
टोचुनी । टोचुनी
रक्ताळे । पराणी नियमांची

आ. एकांतात । सळसळ
वृक्षलता । हालतात

––येथे नियमितपणाचा थोडा अतिरेकच झाला आहे तो अपवादात्मक. तरीही बापटांच्या पुष्कळ कवितांमध्ये जो एक

रचनेचा लाकडीपणा असतो तसा प्रकार केच्यांच्याबाबत कधी घडत नाही.

त्यांच्या रेखीवपणाचे गमतीदार उदाहरण म्हणजे आद्य यमके :

अ. अर्ध्यांत मी अडे
अंतराय वाढे सोबत्यांशी

आ. एकट्या दुःखाचे
एक जरी मन

इ. आभाळाची शेंग उलावी
आजच गळतो येंच उद्याचा

—ही आद्य स्वरयमके. आणि—

अ. गुळाची आंचील
गुळचट साय

आ. मलाच हारवी
मनात मिरवी फेनमाला

इ. रात सावळी निवांत
राही अंडे उबवीत भावनांचे

—ही आद्य व्यंजनयमके. याहून अधिक सूक्ष्म वा संमिश्र उदाहरणे खूपच आहेत. गंमत ही की हे केच्यांनी जाणिवेने केलेले नसावे. एरवी ते इतके अकृत्रिम वाटते ना.

'टिकली एवढे', 'झालो मी येथला', 'पाहून सागरा', 'समारोह', 'चुळबूळ', 'रंग', 'झिंग' इत्यादि केच्यांच्या मौलिक कविता

टिकलीएवढे
फूल जवसाचे
निळ्या अगासाचे निळे पिलू
इतुके न चुके
बापाचा स्वभाव
लाड – निळा चेव डोळ्यातला
बागडे लचाड
कोवळी लकाकी
मजशी ओळखी लावू पाहे
तुझे नाही; तुझ्या
लेकराचे गाल
तेही पुरतील पुरतील

—जवसाचे फूल केवढे तर म्हणे टिकली एवढे! मूर्तीच्या कपाळी लावलेल्या टिकली-एवढे तर नव्हे? निळे पाणी – निळे आकाश पाहून त्यांचे यमक जुळल्याची कल्पना एका कवीला सुचली होती; तिचे सौंदर्य यमका-एवढेच. इथे जवसाचे फूल झाले आहे निळ्या आकाशाचे लेकरू. रात्रंदिवस निळ्याखाली बागडून त्याने आकाशच आपल्यात मुरवून घेतले आहे. पण अशी उसनवारीची भाषा तरी कशाला हवी? निळेपणा हा त्याचा जन्मसिद्ध हक्क. बापाचे सारे गुण या बेट्यात उतरले आहेत. भरीला लाडिक गोडवा. त्याचे नुसते पाहणे पाहा. त्यात निळे चेटुक आहे. आणि हे पोर वेंधळे, आपल्याच हसण्या-खिदळण्यात रमलेले नाही. त्याला आपले – परके माणूस कळते ... म्हणून तर त्याने माझ्याशी लाडीगोडी चालविली आहे. आभाळ प्रियकर, मी प्रेयसी, आणि हे आमचे मूल. मला मुलाचा लोभ आहे. पण प्रियकराचा अधिक. शेवटी प्रणयरस 'ओसंडू' लागला म्हणजे त्याचेच रूपांतर वत्सलरसात होते ना? आज माझी तहान मला इथेंच भागविली पाहिजे ... ... या कवितेचे निरूपण कसे करावे? निर्गुणाची प्रतीती येईपर्यंत भक्त सगुणातच रंगला— असा तिचा आशय आहे? की ही मधुराभक्ती? की...कुठल्याही जिवंत कवितेला आशयाचे अनेक पदर असतात. मात्र कविता ही एक निर्जीव वस्तू आहे ही कल्पना आपण सोडली पाहिजे...एखाद्या विशिष्ट भाववृत्तीने न्हाऊन निघावे व मग तशा निथळत्या अंगाने हरेक अनुभव रेखाटा ही, इंदिराबाईप्रमाणे, केचे यांची पद्धत. फरक इतकाच की इंदिराबाई लौकिक प्रेमाने चिंब होतात तर केचे अलौकिकाच्या प्रेमाने अभ्यंगस्नान करतात. म्हणजेच कुठ-लाही अनुभव घेताना मर्ढेकरांच्या व्यक्ति-त्वाची जशी पुनर्घटना होते तशी केच्यांची (इंदिराबाईंचीही) होत नाही. गती व

स्थिरता यांपैकी, अशा कवींमध्ये, स्थिरता अधिक असते. केच्यांच्या व्यक्तित्वातील स्थिर अंश—अलौकिकावरील श्रद्धा—आणि नवा सचेतन अनुभव यांच्या ताणांतूनच केच्यांचे मौलिक काव्य जन्मास आले आहे.

केच्यांजवळ निरपेक्ष निसर्गप्रेम नाही, की निसर्गाचा संवेदनेच्या पातळीवर अनुभव घेण्याचाही हव्यास त्यांना नाही. तरीही निसर्गाला त्यांच्या काव्यात मानाचे स्थान आहे. निसर्गातर्फे आध्यात्मिक शिकवण नाही. विविध निसर्गप्रतिमांतून एखादी भाववृत्ती व्यक्त करण्याचाही यत्न नाही. तर अध्यात्मनिष्ठा व निसर्गप्रतीती यांचे अद्वैत; इतके की ही निसर्ग कविता की अध्यात्म कविता असा संभ्रम पडावा. निसर्गघटकातही विराट सागराचे आकर्षण अधिक. सागरापासून अनेक योजने दूर राहणाऱ्या या कवीला त्याचे आकर्षण वाटावे हे एका दृष्टीने स्वाभाविकच. 'शेला'मध्येही 'सागरा', 'पाखराच्या पिसापरी', 'कोवळ्या अंधारी', 'समर्पण' इत्यादि सागरकविता आहेत. पण सागराची आंतरिक ओढ त्यात दिसत नाही. उलट 'माझ्या समोर सागर', 'झालो मी येथला', 'पाहून सागरा' या 'दिंडी'तील सागर—कविता खास केचे—वळणाच्या नि मौलिक आहेत. कदाचित केच्यांच्या 'विराटा'ला अफाट सागर स्वभावतःच मानवत असेल! भव्यतेची मोहिनी असलेल्या कुसुमाग्रजांच्या काव्यातही एक प्रतीक म्हणून सागर नेहमी येतो हे लक्षात ठेवण्यासारखे आहे.

विठ्ठल अगाध, अथांग भासला की त्याला मातापिता मानून त्याच्या अंकावर लोळण घ्यावी व तो चिमुकला दिसला की त्याला मांडीवर खेळवावे ही केच्यांची रीत. 'गुळाची आंचील', 'अवघे ब्रह्मांड', 'प्यालो स्तनातून' या 'दिंडी'तील व 'नाते', 'पंगत', 'लळा' या 'थेंब'मधील कविता यामुळेच उदात्त—वत्सल रसांनी भिजल्या आहेत.

कधी निसर्ग आणि वात्सल्य यांच्या मिठीतूनही त्यांचे अलौकिकाचे प्रेम अवतरते. आणि मग ते सहज लिहून जातात :

> चुट्ट चुट्ट ओठ
> वाजतात पाने
> माझ्याच रोखाने वारा वारा

'दिंडी' व 'थेंब' यांची तुलना करताना 'थेंब'मधील अखेरच्या कविता कच्च्या म्हणून आपण टाकून देतो. पण 'दिंडी'मध्ये नसलेली एक नवी गोष्ट 'थेंब'मध्ये आहे—मधुराभक्ती, 'रंग', 'नाच', 'अभिसार', 'रती', 'सोस', 'झिंग' इत्यादि कवितांत प्रणयभावनेतून अलौकिकाचे दर्शन घडते. त्यांतही 'रंग' व 'झिंग' या कविता वैशिष्ट्यपूर्ण आहेत. भुलाबाईची गाणी म्हणतात त्या चालीवर त्या म्हणायला हव्या तरच त्यांच्यातील खरी धुंदी जाणवेल! पण तरीही निसर्गानुभव किंवा वत्सलभाव यांच्याशी जसा केच्यांचा विठ्ठल सहज सायुज्यता पावतो तसे येथे घडत नाही. येथे प्रणयभावना वेगळी जाणवते, असे का घडते? कदाचित केच्यांचा स्वभाव—प्रणयभावनेचे पुरेसे उदात्तीकरण त्यांना साधत नसावे. कदाचित आपलाच स्वभाव, पूर्वग्रह : मराठी भक्तिकाव्यात असलेली तोकडी मधुराभक्ती.

निखळ आध्यात्मिक कविताही केच्यांनी लिहिल्या आहेतच. 'दिंडी गेली पुढे', 'तुका म्हणे उगे राहा', 'समारोह', 'सोहळा', 'गाणे' या कवितांतून, केचे ज्याच्यामुळे एकदम गाजले तो त्यांचा भक्तिभाव अंतरीच्या खुणेने अवतरला आहे. अशा कविता पारंपरिक होण्याची केवढी भीती. पण संतांची मूल्ये, अनिलांची वृत्ती व मर्ढेकरांच्या लकबा असा त्रिवेणी संगम नकळत त्यांच्या व्यक्तित्वात झालेला असल्यामुळे त्यांची कविता

सहसा पारंपरिक होत नाही. ईश्वराचा साक्षात्कार इच्छित असूनही न होणे–हा संतकाव्यातील नेहमीचा अनुभव. पण केचे मात्र त्याला असे आपले रूप देतात :

नवे रूप घ्याया
वितळले मन
आकारावे पण कोणापरी
नसताना येथे
तुझा मुळी भास
साच्याविना रस ओतू कोठे ?

कधी शरणागती पत्करून ईश्वराची आराधना करावी, कधी त्याला मूल मानून गोंजारावे, कधी बालवृत्ती धारण करून त्याच्यापाशी हट्ट धरावा तर कधी त्याच्याशी प्रणयाचे नाते जोडून त्याचा अनुनय करावा हा सारा प्रकार जुन्या संतकाव्यात आहे. तसा केच्यांच्या कवितेतही आहे. आणि तरीही या दोन काव्यांमध्ये काहीतरी महत्त्वाचा फरक आहे असे वाटत राहते. संतांच्या कवितेमागे त्यांचे सारे अस्तित्व उभे आहे. केच्यांचे तसे होते का? केचे अप्रामाणिक आहेत असे कोणी म्हणणार नाही; पण त्यांच्या प्रामाणिकपणाला मर्यादा आहे : आपल्या अनुभवाकडे आणि अभिव्यक्तीकडे ते वाङ्मयीन भूमिकेतूनच पाहतात, त्याच्या पलीकडे त्यांना जाता येत नाही. करंदीकर–पाडगावकरांचे सोडाच इंदिराबाईंनाही हीच मर्यादा आहे. केच्यांच्या उत्कृष्ट कविता म्हणजे त्यांच्या अस्तित्वाची अपरिहार्य, अंतिम व एकमेव प्रतिक्रिया आहे असे जोपर्यंत रसिकाला वाटत नाही तोपर्यंत ते मर्ढेकर–मुक्तिबोध यांच्याजवळ जाऊ शकत नाहीत.

पण ही फार मोठी अपेक्षा झाली...

केच्यांना आपल्या सहानुभूतीविषयी एवढा सहज विश्वास आहे की प्रतिमांचा अनाठायी मोह त्यांना कधीच पडत नाही. याचा अर्थ त्यांच्या कवितेत प्रतिमा नाहीत असे नाही; पण प्रतिमांचा पसारा मांडण्यापेक्षा एखाद्याच प्रतिमेतून कविता साकारू देणे त्यांना मानवते. मग ही प्रतिमा सागराची असेल, आकाशाची असेल, अंकुराची असेल, बीजाची असेल, किंवा यात्रेची किंवा विठ्ठलाचीही असेल. या एकेरी प्रतिमांचा उपयोगही ते इतका नाजुक करतात की त्यांना चुकूनही रूपकाने बटबटीत रूप येऊ नये.

जुन्या प्रतिमाघटकांच्या संबंधातून नवी समानता प्रस्थापित करणे ही केच्यांची एक लकब.

आपुला प्रकाशात शृंगार
रुचेल त्यांना गडे रुचूं दे कृष्ण, गडद अंधार

—असे पाडगावकरांनी ज्योति-पतंगासंबंधी म्हटले असेल तर तेथे अशीच जुन्यातून नवी समतानता निर्माण झाली आहे असे म्हणता येईल. पण हा स्थूल प्रकार झाला. 'जगी सांगतात प्रीत पतंगाची खरी। झड घालुन प्राण देतो दीपकाचे वरी' याची उलट बाजू दाखविल्यासारखे झाले. केचे जुन्यातून जी नवी निष्पत्ती करीत असतात ती एवढी स्थूल नाही.

तुझ्या शोधात आनंद
नको सराया ही वाट
बरे झाले पुंडलीका !
मागे भिर्कावली वीट

येथे 'पुंडलीक' व 'परमेश्वर' या घटकांमध्ये, मूळ अर्थ न खोडता, एक नवाच भावनिक संबंध कवीने प्रस्थापित केला आहे.

पुरवावा आता
शेवटचा हट्ट
ऊर व्हावे वीट पंढरीची

—येथेही अशीच जुन्यातून नवी समतानता घडविलेली दिसेल. केच्यांच्या सौम्य व सहज कवितेमध्ये मधूनच एक चमकारणा दिसतो तो या नव्या समतानतेमुळे. परिचित

घटकांची नवीच भावसमीकरणे ते मांडीत असल्यामुळे आपल्या बुद्धीला कधी दचकल्यासारखे, तर कधी सुखावल्यासारखे होते. पण त्यांची ही निर्मिती काही बौद्धिक नसते. म्हणूनच तिला रूढ शब्दांत 'कल्पकता' असे म्हणण्यापेक्षा 'नवी समतानता' म्हणणे अधिक योग्य. केच्यांचा अंधार 'विठूरंगी काळा घोर' असतो, त्यांच्या 'पाण्याच्या डहाळीला पाण्याचीच कळी' येते, त्यांचे मरण मोर होऊन नाचते, ते वाटेस सेंदूर लावतात, त्यांच्या कसोटीचा गोटा देव होतो. अंधार-प्रकाश, सागर-विवर्त, मोर-मेघ, आकाश-पक्षी, सूप-दाणे या संतकाव्यांत वावरणाऱ्या प्रतिमाघटकांचा केचे कसा आगळाच उपयोग करतात तेही पाहण्यासारखे आहे.

केच्यांची कविता वाचताना आपल्याला कधी बहिणाबाई चौधरी यांची आठवण होते याचे कारण नवी समतानता, संयत भावना, भाषेचे अग्रांथिक रूप, अभिव्यक्तीची सहजता, मराठमोळा छंद...पण मुख्य म्हणजे नागरी जाणिवांपासून दूर असलेली त्यांची मने. बहिणाबाईंनी 'छापखान्यां'वर एखादी कविता लिहिली व केचेही कधी --

माझ्या वज्राच्या हातांनी
साऱ्या शक्ती वळविल्या
विज्ञानाच्या दावणीने
ढोरासारख्या बांधल्या

--असे म्हणतात; 'थेंब'मध्येही 'विज्ञाना'चा एखादा उल्लेख सापडतो. पण एकूण मनाने व शरीरानेही केचे या आधुनिक युगापासून दूरच आहेत. म्हणूनच 'इंजिनाविण गाडी जेवी घरंगळे' अशी त्यांच्या 'अभंग-ओवी'वर पाळी येत नाही.

या नागरी जाणिवांच्या अभावामुळेच त्यांच्या काव्यातील छातीवरचे व कमरेखालचे संदर्भ अश्लील वाटत नाहीत.

अ. पान्हावे मायेचे
कोणतेही अंग
छाती आणि जांघ भेद नाही

आ. देई असा दिव्य
कोमळाचा स्पर्श
ज्यात वीर्यनाश संभवेना

इ. मीही असा पिसा
पुरुष असून
दूध छातीतून सांडो पाहे

—यातील 'आ' उदाहरण वा. ना. देशपांडे यांना अश्लील वाटले! वास्तविक वाटू नये. आणि तिसऱ्या अवतरणाचा सहज-भेदकपणा तर केवळ अपूर्व आहे! सांस्कृतिक पूर्वग्रहांमुळे नागर साहित्यिक पुष्कळदा आपल्या मनातील विशिष्ट आशय व्यक्त करू शकत नाही आणि मग अवघडून, ओशाळून व्यक्त करण्यातच तो आशय अश्लील बनतो. केच्यांचे तसे होत नाही.

बाई आणिक माणूस
तसा मुळी न फरक
एक कूसच अधिक बाई लागी

या ओळी लोकसाहित्यातील वाटाव्या एवढ्या अव्याज आहेत. याचे कारण त्या मागचे मनही 'लोकसाहित्य'कारासारखे निरोगी, पूर्वग्रहरहित आहे.

केच्यांच्या प्रतिमांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्यांची गतिसूचकता. अशा गतिसूचक प्रतिमा जाणिवेने व विपुलतेने प्रथम वापरल्या मर्ढेकरांनी. 'चुळबूळ' या कवितेत केच्यांनाही ती किमया नकळत साधून गेली.

मातीमोल जिणे
जाईल सरून
चियामध्ये मन ठेवोनिया
मग मल्हाराचा
वाजता मृदंग
अंकुराचे अंग झेपावेल
इवली पोपटी
त्याची चुळबूळ
कवेत आभाळ घ्यावयाशी

तेव्हा न करावी

आदळआपट

त्याचे पटापट मुके घे जो

ही कविता म्हणजे एका थरथरत्या अनुभवाचा तेवढाच थरथरता प्रतिमारूप आविष्कार. शब्दांची आतषबाजी न करता, विशेषणांचा पाऊस न पडता, संवेदनांचा, प्रतिमांचा चमत्कारिक संकर न करता एक भव्य अन् तरीही नाजुक अनुभव येथे कलात्मक झाला आहे. 'शब्द माझ्या ओठी पोटातले' असे केचे म्हणतात त्याचा प्रत्यय अशा स्थळी येतो.

मात्र केच्यांमध्ये प्रयोगसामर्थ्य अगदीच कमी. 'दिंडी'मध्ये मर्ढेकरांना अनुसरून त्यांनी कवितांना शीर्षके देणे टाळले. पण 'येंच'मध्ये हा 'प्रयोग' ते पुढे चालवू शकले नाहीत.

'झिंग्या भोई' व 'पोरवाडी' या कथनप्रधान कविता 'पारखी', 'चोरी' यांना दिलेला मुक्तछंदाचा दृश्य आकार, अलीकडची 'मुक्तके' हे प्रयोगही त्यांना साधलेले नाहीत. प्रयोगशील कवीजवळ निर्मितिप्रक्रियेची खोल जाणीव असावी लागते. तीच केच्यांजवळ नसावी.

केच्यांच्या मर्यादा लक्षात घेऊनही त्यांचे यश मोठे आहे, हे प्रांजलपणे कबूल करावयास हवे.

# विष्णुदासनाम्याचे महाभारत : एक अभ्यास

—व. वि. पारखे

## (३) स्वर्गारोहण पर्व

स्वर्गारोहण पर्व भारताचे अठरावे पर्व असून महाभारताचे ते शेवटले पर्व समजले जाते. या पर्वाचे एकूण पाच अध्याय असून भाण्डारकर प्रतीनुसार त्यांची श्लोकसंख्या १९४ आहे.

### सूत्रारम्भ

आपल्या कीर्तीने, प्रतापाने व सुंदर आचरणाने युधिष्ठिर सशरीर स्वर्गात गेला असता, त्यास सूर्याप्रमाणे तळपत असलेला, व तेजस्वी देव आणि पुण्यकर्मे करणाऱ्या साध्यांच्या समुदायात बसलेला, दुर्योधन दिसला; परंतु त्याचे आप्तेष्ट व सुहृद्बान्धव मात्र त्यास तेथे आढळले नाहीत. तेव्हा युधिष्ठिरास राग येऊन, त्याने अदूरदर्शी व लोभी अशा दुर्योधनासह स्वर्गात न राहण्याचा निर्धार व्यक्त करून, जेथे आपले बांधव, कर्णधृष्टद्युम्नादि लोक वास्तव्य करीत असतील तेथेच जाण्याची आपली इच्छा देवांजवळ व्यक्त केली. नारदाने युधिष्ठिराची समजूत घालण्याचा पुष्कळ प्रयत्न केला परंतु युधिष्ठिराने आपल्या सुहृद्बान्धवांबरोबरची राहण्याची इच्छा व्यक्त करून 'जेथे माझे बन्धू असतील तोच माझा स्वर्ग', असा दृढ निर्धार पुनः व्यक्त केला[१].

युधिष्ठिराचा तो दृढ निर्धार पाहून देवांनी देवदूतास युधिष्ठिराला त्याच्या इष्टमित्रांकडे घेऊन जाण्याची आज्ञा केली. त्या आज्ञेनुसार देवदूत युधिष्ठिरास घाणेरड्या व बिकटमार्गाने नरकात घेऊन गेला. महाभारतात या ठिकाणी वाटेत लागणाऱ्या घाणेरड्या मार्गाचे व नरकाचे बीभत्स वर्णन केलेले आढळते[२].

---

१ म. भा. १८.१. १ ते २,१२

२ म. भा. १८.२. १६ ते २५

नरकातील दुर्गन्धीने युधिष्ठिर जवळजवळ मूर्च्छितच झाला. तेथून तो देवदूतांबरोबर माघारी वळणार तोच त्याला आपल्या विव्हळणाऱ्या बांधवांचे दीन शब्द ऐकू आले. त्यांनी त्याला क्षणभर तेथेच उभे राहण्यास विनविले; कारण त्याच्या आगमनामुळे नरकात सुगंधी पवित्र वारा वाहू लागला होता व कितीतरी काळानंतर असा आनंद त्यांना भोगावयास मिळाला होता! धर्मवेत्ते, शूर, सत्यभाषी, क्षत्रियधर्मरत व दानशूर अशा आपल्या बांधवांना नरकलोकाची प्राप्ती झाल्याचे पाहून युधिष्ठिर अत्यंत दुःखित झाला, व देवदूताला स्वर्गात परत जाण्यास सांगून तो स्वतः मागेच राहिला[1].

काही वेळ युधिष्ठिर नरकात उभा राहिला असता इन्द्रप्रभृती देव तेथे आले. त्यांच्या आगमनाने अंधःकार नष्ट झाला, पापकर्म्यांच्या यातना नष्ट झाल्या; नरकाचे स्वरूप पालटले जाऊन सर्वत्र सुगंधी, शीतल, पवित्र वायू वाहू लागला. इंद्र युधिष्ठिराचे सान्त्वन करीत म्हणाला, 'सर्वच राजांना एकदा नरक पाहून घ्यावा लागतो. शुभ आणि अशुभ अशा कर्मांच्या दोन राशी असतात. जो प्रथम शुभ कर्मांचे फळ भोगतो, त्याला मागून नरक भोगावा लागतो. परंतु प्रथम नरक भोगणाऱ्याला मागून स्वर्गसुख मिळते. म्हणून तुला तुझ्या हितास्तव नरकाकडे पाठविण्यात आले. पुत्राबद्दल प्रश्न विचारणाऱ्या द्रोणाला तू शब्दच्छल करून फसविलेस म्हणून तुलासुद्धा ह्या भासमान नरकात जावे लागले. जसा तू तसाच भीम, अर्जुन, नकुल, सहदेव व द्रौपदी हीही केवळ भासमान नरकातच गेलेली होती!'

इंद्र व धर्म यांच्या सांगण्यावरून युधिष्ठिराने देवनदी गंगेत स्नान केले. त्यामुळे त्याचे मानवी शरीर नष्ट होऊन त्याला दिव्य शरीराची प्राप्ती झाली व तो देवांसह पुनः स्वर्गात गेला[2].

तेथे त्याला ब्राह्मशरीर धारण करणारा श्रीकृष्ण दिसला; त्याच्याच जवळ तेजःपुंज अर्जुनही उभा होता. दुसरीकडे कर्ण बारा आदित्यांसह बसला होता; दिव्यरूप धारण केलेला भीम मरुद्गणांसह वायूच्या सन्निध बसला होता. तसेच नकुल आणि सहदेव अश्विनीकुमारांजवळ बसून दिव्य तेजाने तळपत होते. जी स्वर्गलक्ष्मी केवळ धर्मराजास्तव, द्रौपदीरूप धारण करून मनुष्यलोकी द्रुपदाच्या कुलात अवतरली व जिला, प्रत्यक्ष शंकराने पांडवांच्या प्रेमामुळे निर्माण केले होते, ती कमलाप्रमाणे कांती असलेली द्रौपदी आपल्या सूर्यासारख्या तेजाने सारा स्वर्ग प्रकाशित करीत होती.

यादवांकडील महावीर सात्यकिप्रभृतींबरोबर साध्य, विश्वेदेव, मरुद्गण यांच्यामध्ये बसले होते, चंद्रासमान शोभणारा अभिमन्यू सोमाजवळ बसला होता. भीष्म वसूंमध्ये आणि द्रोणाचार्य बृहस्पतीजवळ बसलेले होते. अशाप्रकारे युधिष्ठिराला आपल्या बांधवांप्रमाणेच आपले इतर आप्तेष्टसुद्धा आपल्या मूळस्थानी जाऊन बसलेले दिसले[3].

यानंतर, जनमेजयाने, भीष्म, द्रोण, धृतराष्ट्र, विराटराजा, द्रुपदराजा, शंख, राजपुत्र उत्तर, धृष्टकेतू, जयत्सेन, सत्यजित, दुर्योधनाचे पुत्र, शकुनी, कर्णपुत्र, जयद्रथ, घटोत्कचादि मंडळी स्वर्गात किती काळ राहिले? तेथे त्यांना शाश्वत स्थान मिळाले की कर्मफल भोगल्यावर

---

१ म. भा. १८.२. ३० ते ५२

२ म. भा. १८.३. १ ते ४१

३ म. भा. १८.४. १ ते १९

ते अन्य गतीला गेले? अशी पृच्छा केली असता, व्यासांच्या अनुमतीने त्याच्या प्रश्नांची उत्तरे वैशंपायनाने दिली; असा कथाभाग वर्णिलेला आहे[1]. कौरवपांडवांचे चरित्र येथपर्यंतच्या भागात विस्ताराने सांगून झाल्यामुळे महाभारत येथेच संपते. उरलेल्या भागात जनमेजयाच्या यज्ञसमातीचा उल्लेख, महाभारताचे महत्त्व व त्याच्या श्रवणाचे फळ, इत्यादि भाग आलेला असून त्यानंतर स्वर्गारोहणपर्व समाप्त होते; तसेच महाभारत पण समाप्त होते.

विष्णुदासनाम्याच्या स्वर्गारोहणपर्वाची तुलना आपणांस व्यासमहाभारताशी करता येत नाही. कारण त्याचे स्वर्गारोहणपर्व व्यास-महाभारतापेक्षा फारच भिन्न असून ते, व्यास-महाभारतातील तीन पर्वांचे मिळून एक कड-बोळे तयार झालेले आहे.

विष्णुदासनाम्याच्या स्वर्गारोहणपर्वाचे सात प्रसंग आहेत. सामान्यतः, पहिल्या तीन प्रसंगांत त्याने व्यासमहाभारतातील मौसलपर्वाचे कथासूत्र घेतलेले आहे. यात,-मुसळाची उत्पत्ती व त्यायोगे यादवांचा नाश, बलराम व कृष्ण यांचे निजधामास जाणे, द्वारका समुद्रात बुडते, श्रीकृष्णाच्या सोळा सहस्र स्त्रियांनी विषप्राशन, अग्निदिव्य, गळफास, समुद्रात जीव देणे, शस्त्राने ठार मारून घेणे; इत्यादि मार्गांनी जोहार करून घेणे;-इत्यादि कथानक आलेले आहे. उरलेल्या प्रसंगांत त्याने महाप्रस्थानिकपर्व आणि स्वर्गारोहणपर्व या दोन पर्वांचा कथाभाग संमिश्र करून सांगित-लेला आहे. या भागात त्याने,-पांडवाचे उत्तरे-कडे महाप्रस्थान, द्रौपदीपासून प्रारंभ होऊन युधिष्ठिर सोडून सर्व पांडवांचे एकामागून एक मरून पडणे, युधिष्ठिराचे वैकुंठी श्वानासह गमन, वाटेत त्याचे 'कुंभपाक' नरकात वास्तव्य, त्या नरकाचे वर्णन, वैकुंठात श्रीकृष्णा-सह भीम, अर्जुन, नकुल व सहदेव आणि द्रौपदी यांचे त्यास होणारे दर्शन,-इत्यादि भाग वर्णन केलेला आहे. परंतु या सर्व प्रसंग-वर्णनास विष्णुदासनाम्याने स्वतंत्र रचनेची जोड इतकी दिलेली आहे की, त्यापुढे व्यास-महाभारताधिष्ठित कथाभाग निष्प्रभ वाटावा!

विष्णुदासनाम्याच्या स्वर्गारोहणपर्वात, आपणांस महाभारताच्या तीन पर्वांची सरमेळ झाल्याचे जे दृश्य दिसते, ते त्याने बुद्धयाच उभे केलेले आहे असे दिसून येते. तो आपल्या आदिपर्वात म्हणतो—

मग सकळ ऋषेश्वर निघाले:
पराशराजवळी आले:
आता सांगा जी वहिले:
हरीवंसीचे गहीवरा: ॥ प्रसंग १ : ओवी १३ ॥

तसेच कर्णपर्वात तो सांगतो—

श्रीभागवतीचा ईतीहासु:
साधे पारासुराचा व्यासु:
नामा म्हने विष्णुदासु:
चीत देउनी परीयेसी: प्रसंग १ ला : ओवी ६

त्याचप्रमाणे स्वर्गारोहणपर्वात विष्णुदास-नामा म्हणतो—

जी हे कथा पुण्यपावन:
भागवतिचा इतिहास सुजाण:
पातकांसि मुळीहुन:
ऊन्मळुन काढी: ॥ प्रसंग ७, ओवी ८९ ॥

या उल्लेखांवरून आपणांस असे आढळून येईल की, विष्णुदासनाम्याने आपले [illegible] व्यासमहाभारत [illegible] नसून, ते [illegible] वंश आणि श्रीमद्भागवत या दोन ग्रंथाच्या द्वारे रचिलेले आहे! श्रीमद्भागवतात महा-भारताची संक्षिप्त कथा वर्णिलेली आहे. आपल्या महाभारतासाठी विष्णुदासनाम्याने तेच कथासूत्र घेतलेले आहे! श्रीमद्भागवताच्या एकादशस्कन्धाच्या १,६,३० व ३१ या चार अध्यायांत व्यासमहाभारताच्या मौसलपर्व व महाप्रस्थानिकपर्व, यांचा संमिश्र कथाभाग

१ म. भा. १८.५. १ ते २५

वर्णिलेला आहे. विष्णुदासनाम्याने तोच कथाभाग आपल्या स्वर्गारोहणपर्वात घेऊन त्यास व्याससमहाभारताच्या स्वर्गारोहणपर्वात येणाऱ्या कथाभागाची अल्प पुस्ती जोडल्यामुळे तेथे व्याससमहाभारतातील तीन पर्वांचे कडबोळे तयार झाल्याचे दृश्य आपणांस दिसते! विष्णुदासनाम्याच्या महाभारताबद्दल एका विवेचनात्मक अभ्यासात म्हटले आहे[1]--

"विष्णुदासनाम्याने मुसलीपर्व, प्रस्थानपर्व व स्वर्गारोहण ह्या पर्वातील कथा एकमेकात मिसळल्या आहेत व बरीच पुनरुक्ती केलेली आहे." परंतु त्याने असे का केले याचे कारण मात्र तेथे दिलेले नाही." ते आता येथपर्यंतच्या विवेचनावरून स्पष्ट होईल. श्रीमद्भागवत व व्यास महाभारतात येणाऱ्या या कथाभागाशिवाय विष्णुदासनाम्याने आपल्या स्वर्गारोहणपर्वास इतर कथानकाचीही फार मोठी जोड दिलेली आहे. ह्या भागापैकी काही भाग त्याने इतरांकडून घेतलेला असून, काही त्याने स्वतंत्र रचलेला असावा.

विष्णुदासनाम्याच्या स्वर्गारोहणपर्वात महाभारतावर आधारित नसलेला जो भाग येतो त्यात प्रामुख्याने,–कलीवर्णन[2], रामायणातील सीताहरणाचा प्रसंग, रामाचे किष्किंधेस आगमन; सुग्रीव आणि वाली यांचे कथानक[3], कलीची माया[4], उत्तरेकडील अरण्यात तालकेतूच्या तडाख्यात द्रौपदी सापडणे व भीमाच्या हातून तिची झालेली सुटका[5], धर्माच्या हातून अप्रत्यक्षपणे घडलेली हिंसा[6]; इत्यादि कथानक वर्णिलेले आहे.

धर्माचा नातू परीक्षित राज्य करीत असता कलीची छाया पडली. त्यामुळे धर्माच्या देहात नाना कुबुद्धी निर्माण होऊ लागल्या. याचे कारण कोणते? असा धर्माने श्रीकृष्णाला प्रश्न केला असता, श्रीकृष्णाने कलीमुळे कोणकोणता परिणाम घडेल ते त्याच्यासमोर वर्णिलेले आहे. श्रीकृष्ण धर्मराजाला म्हणतो,–

"ब्राह्मण देवतार्चन सोडतील, गायत्रीमंत्र जपणार नाहीत, नाना कुमंत्रांचा ते जप करतील; ईश्वरदर्शन घेणार नाहीत, शाळिग्रामाची पूजा करणार नाहीत; प्रेताभुतांचा भजनविधी करतील, स्वधर्माचा त्याग करतील! नीचांची चाकरी करून ते आचारभ्रष्ट होतील! नारी भ्रतारास सोडतील, सर्व लोक अन्नमार्गी होतील! कुळांगना सोडून पुरुष दासी, वेश्यांप्रत जातील; गुरूस शिष्य मानणार नाहीत, सिद्धमंत्र फळणार नाहीत तर कुमंत्र फळतील!"

कलीचे केलेले हे वर्णन महाभारतावर आधारित नाही. परंतु त्यास श्रीमद्भागवताच्या द्वादशस्कंधाच्या दुसऱ्या अध्यायाचा आधार आहे. इ. स. च्या सोळाव्या शतकातील महाराष्ट्राचे सामाजिक दर्शन, या उताऱ्यातून आपणांस घडू शकेल! वस्तुतः विष्णुदासनाम्याने येथे समाज भ्रष्ट कसा झालेला होता हेच अप्रत्यक्षपणे आपणांस दाखविलेले आहे. महाराष्ट्राच्या सामाजिक अधोगतीचे चित्र, विष्णुदासनाम्याप्रमाणे आपणांस एकनाथमहाराज आणि समर्थ रामदास या दोघांच्या साहित्यकृतीतसुद्धा बघावयास मिळते.

विष्णुदासनामानंतर, ब्रह्मदेवाने श्रीकृष्णाकडे येऊन त्याला निजधामास परतण्याबद्दल विनंती केल्याचे, कथानक वर्णन करतो.[7] हा भाग महाभारतावर आधारित नसून तो

---

(१) विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास : Ph. D. Thesis : (१९६०) पान २५६

(२) वि. ना. स्वर्गा. प्रसंग १ ला ओव्या ७२ ते ८५

(३) तत्रैव प्रसंग २ रा ओव्या २१ ते ४६

(४) तत्रैव प्रसंग ३ रा ओव्या ८४ ते १२५

(५) तत्रैव प्रसंग ४ या ओव्या २० ते ९९

(६) वि. ना. स्वर्गा. प्रसंग ७ वा ओव्या २० ते ८३

(७) वि. ना. स्वर्गा. प्रसंग २ रा ओव्या १ ते ९

श्रीमद्भागवताच्या एकादशस्कंधाच्या सहाव्या अध्यायावर आधारित आहे.

मौसलपर्वामध्ये एका व्याधाने श्रीकृष्णाच्या पायाला बाण सोडून विद्ध केल्याचे वर्णन येते.[१] या प्रहारामुळेच श्रीकृष्णाचे देहावसान झाले, परंतु त्या व्याधाला मात्र कृष्णकृपेमुळे स्वर्गप्राप्ती झाली! हा व्याध म्हणजेच, 'वाली तोच धीवर व राम तोच श्रीकृष्ण' असे विष्णुदासनाम्याला सांगावयाचे असल्यामुळे, त्याने रामायणातील हा कथाभाग स्वर्गारोहणपर्वात वर्णन केलेला आहे! श्रीकृष्ण याज्ञवल्कीच्या कथाकल्पतरू-मध्येसुद्धा, मौसलपर्वाचे कथानक सांगताना, श्रीकृष्णाने आपल्या पूर्वजन्मी, रामावतारात, या व्याधासारखेच वर्तन केले होते, असा उल्लेख सापडतो[२].

या कथाभागानंतर विष्णुदासनामा पांडवांच्या महाप्रस्थानाचे वर्णन करतो. परीक्षितास राज्यपद देऊन, तीर्थयात्रेच्या मिषाने हे सर्व बाहेर निघतात. जाताना धर्म पक्ष्यांचा व श्वापदांचा निरोप घेतो. धर्मराज श्वापदांना वनात निघून जाण्यास सांगून, पक्ष्यांना, 'मनुष्यावर विश्वासून राहिलात तर तुमचा प्राणघात होईल,' असा उपदेश करतो[३]. अशा-प्रकारच्या उपदेशाचे व निरोपाचे वर्णन महाभारतात येत नाही. स्त्रीपर्वामध्येसुद्धा, भानुमती, पांडवांच्या सभेत जाण्यापूर्वी, पशू व पक्षी यांचा निरोप घेत असल्याचे वर्णन विष्णुदासनामा करतोच[४]. हे वर्णन वाचून आपल्या डोळ्यांसमोर क्षणभर, शाकुंतलातील एक प्रसंग तरळून जाईल! कण्वाच्या आश्रमातून पतिगृही जाण्यासाठी निघत असताना, शकुंतलासुद्धा लतावेलींचा, आश्रमवासीय पशुपक्ष्यांचा, निरोप घेत असते! परंतु गुजराथेत 'विप्रविष्णुदास' या नावाचा एक महाभारतकार होऊन गेला. त्यानेसुद्धा अठरापर्वी भारत गुजराथी भाषेत रचलेले आहे. हा विप्रविष्णुदास आपल्या महाभारतात, कालिदासप्रणीत रामायणातील व रघुवंशातील गोष्टी, आपल्या विष्णुदासनाम्याप्रमाणे समाविष्ट करतो[५]!

पांडवांच्या महाप्रस्थानयात्रेत त्यांना दोन भयंकर दिव्यांतून जावे लागते. त्यांपैकी पहिले दिव्य कलीच्या तडाख्यातून पार पडण्याचे! कलीला धर्माची भेट घेण्याची इच्छा होते. त्यासाठी तो एक मायाकपट निर्माण करतो. प्रवासास निघालेल्या धर्माला अत्यंत भूक लागते. त्याला जवळच एका वाडीत वेलीवर वाळके लागलेली दिसून येतात. आसपास कोणी नसते. तेव्हा त्यांतील पाच वाळकी पदरात बांधून तो वेगाने तेथून चालू लागतो. परंतु कली ते बघतो व स्त्रीरूप घेऊन त्याच्या मागून धावू लागतो, पळता पळता दोघेही एका नगरात शिरतात. ती स्त्री मोठा आक्रोश करून लोकांना गोळा करते, व त्यांना, या महापाप्याने आपल्या पाच बालकांना ठार मारल्याचे वृत्त सांगते. लोक जेव्हा त्याला पकडतात तेव्हा त्याच्याजवळ पाच बालमुंडे दिसून येतात. ते पाहून ती स्त्री लोकांना याचा सूड घेण्यास सांगते. काहीजण म्हणतात "हे शुद्ध संन्यासी नाहीत! यांना सुवर्णपंथी म्हणा!!" काहीजण म्हणतात, "यांना तीर मारा, सुळी द्या." कित्येक, पाणी नाही तेथे त्यांना नेऊन त्यांचा शिरच्छेद करावा, अशी मागणी करतात. अशा परिस्थितीत त्यांना नगरातील सभेपुढे उभे केले जाते. तेथे पाच पांडवांना सुळी देऊन त्यांची

१ म. भा. १६.५. २०. ते २१
२ कथाकल्पतरू: पूर्वार्ध भाग १ ला, स्तबक १ ले, अध्याय १४ वा, पान ६२
३ वि. ना. स्वर्गा. प्रसंग ३ रा, ओव्या ६७ ते ६९
४ विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास, पान १९९
५ बृहत् काव्यदोहन भाग ८ मो, प्रस्तावना पृष्ठ ५९

बायको हिरावून घ्यावी, असा निर्णय घेतला जातो.

मग पाच सूळ आणून, त्यांच्या खांद्यावर लादून, वाद्यांच्या गजरात त्यांना शहराच्या बाहेर आणण्यात येते. सूळ रांगेत उभे केले जातात. यांना आता सुळावर चढविले जाणार हे पाहून द्रौपदी फार भिते व श्रीकृष्णाचा धावा करू लागते, 'तू आता निजधामास गेलेला आहेस! आता मी कोणाची करुणा भाकू? मला जेव्हा जेव्हा संकट पडले तेव्हा मी तुझा धावा केला व तू धावून आलास! हे कृष्णा, आता आम्हांस कोण सोडवील?'

द्रौपदीचा धावा ऐकून कलीस भय पडले व त्याने आपले खरे रूप धर्मासमोर प्रगट केले. कोटी सूर्यांचा प्रकाश झगमगला. त्याने सर्व आकाश भरून गेले. स्त्रीचा पुरुष झाला व कली धर्माच्या चरणी लागला! तो धर्माला म्हणाला, "तुला भेटावयाची माझ्या मनात फार इच्छा होती. परंतु माझा धर्म सोडून तुला मी कसा भेटू?" तेव्हा धर्म म्हणाला, "तू केलेस तेच बरोबर केलेस! ज्याचा जो धर्म आहे तोच त्याने आचरावा. तो सोडला असता दोष लागतो. तू केलेस ते बरोबरच केलेस!" तदनंतर द्रौपदीसह ते सहाजण उत्तरेकडे निघाले, इतके कथानक विष्णुदासनाम्याने कलीमायेच्या वर्णनात सांगितलेले आहे[१]. विष्णुदासनामा वर्णीत असलेले कलीमायेचे हे कथानक, कृष्ण याज्ञवल्कीच्या कथाकल्पतरूमध्ये, महाभारताच्या स्वर्गारोहणपर्ववर्णनप्रसंगी, सांगितलेले आहे[२].

कलीच्या तडाख्यातून सुटल्यानंतर पांडवांना आणखी दुसऱ्या दिव्यातून जावे लागते. उत्तरेकडे ते प्रवास करू लागले असता, मार्गात त्यांना तालकेतू दैत्याची अरण्यपूर नावाची राजधानी लागते. पांडव त्याच्या राज्यातून जात असता एका चौकीवर उभ्या असलेल्या तालकेतूच्या दृष्टीस ते पडतात. विष्णुदासनामा यानंतर जे कथानक वर्णन करतो ते, आधुनिक रहस्यकथांनाही लाजविण्याइतके रहस्यमय व अद्‌भुत आहे!

तालकेतू या लोकांना बोलावून विचारतो, 'आपण कोण आहात?' पांडव उत्तर देतात, 'आम्ही संन्यासी असून यात्रेस जात आहोत!' त्यानंतर पुनः तालकेतू म्हणतो, 'तुम्ही आपणांस संन्यासी म्हणविता तर या स्त्रीला बरोबर का नेता? हे संन्याशाला प्रत्यक्ष विघ्न आहे! तेव्हा तुम्ही संन्यासी नसून या बाईस फसवून नेत आहात! जोपर्यंत हे रत्न कोणाचे आहे हे तुम्ही सांगत नाही तोपर्यंत मी तुम्हांस जाऊ देणार नाही. या कांतेस हिरावून घेईन! तुमचा वध करीन! आमच्या वाटेवरून अनेक ऋषीमुनी गेले, परंतु असे नवल आम्ही आजवर पाहिले नाही!' पांडव त्याच्याशी न बोलता स्तब्ध राहतात, तेव्हा तालकेतू त्यांचा वध करण्याची आज्ञा आपल्या सेवकांना देतो.

हे पाहून धर्म तालकेतूस म्हणतो, 'हे दैत्यनाथा ऐक! आम्ही पाच पांडव असून सोमवंशीचे राजे आहोत. हा भीम! हा अर्जुन! हे नकुल व सहदेव! ही द्रौपदी! कौरवांनी आमचे राज्य विभागून दिले नाही म्हणून त्यांच्या व आमच्यांत संग्राम झाला व त्यात आमच्या हातून एकशेएक सहोदर, गुरू व पितर आणि अठरा अक्षौहिणी सैन्य ठार मारले गेले. ते पातक नष्ट करण्यासाठी, हस्तिनापुराहून निघून आम्ही तीर्थयात्रेसाठी जात आहोत.' त्याचे उत्तर ऐकून तालकेतू म्हणतो, 'आज पर्वकाळ प्राप्त झालेला आहे! या अर्जुनाने माझा पिता अळींब याला ठार मारलेले आहे. त्याचा मी आता सूड घेणार! हे अर्जुना शस्त्र उचल. अन्यथा मी तुला

---

१ वि. ना. स्वर्गा: प्रसंग ३ रा, ८४ ते १२५

२ कथाकल्पतरू उत्तरार्ध भाग २ रा, स्तबक १४, अध्याय २४

जिवंत जाऊ देणार नाही.' त्यावर अर्जुन म्हणतो, 'तू जर कुरुक्षेत्रावर आला असतास तर तुलासुद्धा मी ठार मारले असते! पण आता आम्ही तीर्थवासी झालो आहोत. आता संग्रामाच्या गोष्टी बोलू नकोस!' धर्म तालकेतूला परोपरीने विनवतो तरी तो ऐकत नाही. हे पाहून भीमास राग येतो व तो त्याच्याशी युद्ध करून त्याला धडा शिकविण्याची भाषा युधिष्ठिराजवळ बोलतो. तेव्हा धर्म भीमाला बोलतो, 'तीर्थक्षेत्री जाताना वाचेनेसुद्धा असल्या गोष्टी बोलू नये! अन्यक्षेत्री केलेले पाप पुण्यक्षेत्री धुवावे; पण पुण्यक्षेत्री केलेले पाप मात्र वज्रलेप होते! म्हणून तू संग्रामाची भाषा आता बोलू नकोस!' असे म्हणून धर्म परोपरीने त्याची करुणा भाकतो परंतु तालकेतूला दया येत नाही!

आता आपली सुटका होत नाही हे पाहून द्रौपदी श्रीकृष्णाचा धावा करू लागते. तो ऐकून स्वतः नारायण, द्विजाचा वेष धरून त्या ठिकाणी येतात व त्याला 'या संन्याशांना का उभे केलेस?' अशी पृच्छा करतात. तेव्हा, हे पांडव असून यांनी माझ्या पित्याला ठार केल्याने, यांच्याशी मला संग्राम करावयाचा आहे, असे कारण तो त्या विप्राला सांगतो. तेव्हा तो विप्र उपहास करीत बोलतो, 'अरे! शरणागत कपोताला अभय देण्यासाठी राजाने आत्मघात केला! हे तुला 'शरण आलो' असे म्हणतात. यांचा तू झुंजून प्राण घेणार? जग तुला हासेल!' तालकेतू पांडवांना सोडण्यास तयार होतो परंतु द्रौपदीस मात्र सोडू इच्छित नाही! ते ऐकून विप्र म्हणतो, 'अरे! हे तर प्रत्यक्ष विघ्न आहे!' तेव्हा तो सर्वांना सोडतो. ते पाहून विप्र अदृश्य होतो.

त्यानंतर पांडव त्या अरण्यातून पुढे जाऊ लागतात. आजूबाजूची वनश्री व पर्वतराजी बघत असता, द्रौपदी मात्र मागे राहून पांडव पुढे निघून जातात. ती त्या घनदाट जंगलात मार्ग चुकते, व परत तालकेतूच्या हद्दीत येते. द्रौपदीला एकटीच पाहून तालकेतूला फार आनंद होतो. आपणांस अकल्पित लाभ झालेला आहे, असे त्याला वाटते! कदाचित हिंस्र श्वापदांनी पांडवांना खाल्ले असेल, असा तो मनात विचार करतो.

इकडे द्रौपदी आपल्याबरोबर नाही हे पाहून पांडव तिचा शोध करू लागतात. धर्माला फार दुःख होते, व तो तिचे गुण आठवू लागतो. द्यूतप्रसंगी, दुर्वासभोजनी, द्रौपदीने आपले रक्षण कसे केले, हे तो आठवतो. नंतर धर्म भीमाला, तालकेतूच्या राज्यात, तिच्या शोधार्थ पाठवितो. मात्र तालकेतूला मारू नकोस! तुला कुंतीची शपथ आहे! अशी शपथ तो त्याला घालतो. तदनंतर भीम त्याच्या राज्यात जाऊन सिंहनाद करतो. तो ऐकून तालकेतूचे दैत्यगण त्याच्या अंगावर धावून जातात. त्या सर्वांचा भीम गदेने कपाळमोक्ष करतो! आपल्या सैन्याचा नाश झाल्याचे पाहून तालकेतू द्रौपदीला घेऊन पळून जाऊ लागतो. परंतु भीम त्याला पकडतो व द्रौपदीला त्याच्या हातून सोडवितो. धर्माने त्याला शपथ घातलेली असते. त्याच्या शब्दाला मान देण्यासाठी तो तालकेतूस जिवंत सोडून देतो व धर्मराजाला येऊन मिळतो. या ठिकाणी हे कथानक संपते.

हे सर्व कथानक इतके अद्‌भुत व रहस्यमय आहे की, आपल्या अंगावर काटा उभा राहतो. या अद्‌भुतास तो भयानकतेचीही जोड देतो. उदाहरणार्थ, त्या निबिड अरण्याचे वर्णन विष्णुदासनामा करतो[1],

पांडव कामीति पंथ : भयानक पडिले वनात : व्रक्ष गगन चुंबीत : लागले आसति ॥ ४४५ ॥ मादोळे व्रक्षांचे दिसति वनि : पावो ठेवावया नसे मेदनि : अवघे वन गुतोनि : राहिले असे ॥ ४६ ॥ तेथे रविरस्मा नाहि पैस : तेथे रीघु कैचा पवनास : काटवण

१ वि. ना. स्वर्गारोहण पर्व (भा. इ. सं. मं. हस्तलिखित पोथी क्र. २९।१६०७)

बहुवस : उर्ठायेलेसे तेथे ॥ ४७ ॥ माहा वन ते दारुण : व्रक्ष राहिले गुत्तोन : जरी जावे डाहाळे वारुन : तरीचि सगरु द्रुष्टि पडे ॥ ४८ ॥ वनि व्रक्ष बहुवस : सायमोहो कळंबाति वस : कंचन धामन भुताकस : जाळि दिर्घ वेळुवांच्या ॥ ४९ ॥ तेथे निंब आणी निबारे सोवरी : वड पिंपळ भोकरी : चीचा जांभळी बोरी : पांगारे असति अपार : ॥ ४५० ॥ तेथे तरवड आणी हिंगण : घोंटी देवदार रक्तचंदन : ताडमाड रातांजन : साळ्या असति अपार ॥ ५१ ॥ भोळशरी आणी गुगळी : चार निवडुंग बाभळी : खैर रामकाटी उठीली : अपार तेथे ॥ ५२ ॥ तया वनात करंज खत्तान बहुत : सिरस लागले अप्रमित : टेंभुरे भोकरे अत्यंत : लोटली झाडे ॥ ५३ ॥ तेथे बीचवे उठीले नेपाति : कर्वदिचीया जाळि बहुति : बेलचीडले दिसाति : रुई मांदार पळस झाडे ॥ ५४ ॥ तेथे मांदोळे मांदोळ्या दाटति : खांदि खांदि करकराति : गगनि गुतले असति : सेंडे सेडियासि ॥५५॥ ते पत्रे पुस्पी कळी करुन : अवघे व्रक्ष वोळाति जाण: ठाई ठाई जीवन: वाहात तेथे ॥ ५६ ॥ त्या घनदाट जंगलाच्या दर्शनानेच माणसाची छाती दडपून जावी ! परंतु त्याची भयानकता वाढविण्यासाठी विष्णुदासनामा वर्णन करतो.

तया वनात सार्धुळ : आरोळीया देति वीशाळ : गर्जन करीति कराळ : व्याघ्रांच्या हावळी ॥५७॥ टाहो करीति मयोरे : आसवले गुणगुणीति अपारे : मातले माहा सोरयोर : बळे क्रीडताति ॥५८॥ गीध झेपावति घारा : वटवाघुळा लोंचाति अपारा : तो असे पै थारा : राम अवतारीच्या वान्नराचा ॥ ५९ ॥ वानरे असाति बहुत : लांसी तरसी धावत : ते माहेर म्हणीजेत : सकळा भुतांचे ॥ ४६० ॥ तेथे झोटींक माहा ब्रह्मराक्षेस : अपार आगीये वेताळ : म्हैसासुर आसरा मुंजीये खेचर : नाना भुते देखा ॥ ६१ ॥ असो ऐसे ते आरण्ये : माहा असे दारुण : सांगता स्वर्गारोहण : उसीर होईल कथेसि ॥ ४६२ ॥ ( स्वर्गा. प्रसंग ४ ) मात्र या वन-वर्णनावर नामा पाठकाचा प्रभाव पडलेला आहे, हे जाणवते[१].

विष्णुदासनाम्याने या भयानकतेस रहस्यात्मकतेची जोड दिलेली आहे. आज-कालच्या आधुनिक रहस्यकथेत ज्याप्रमाणे एखादी नायिका गुंडांच्या तावडीत सापडून नायक व नायिकेच्या जीवावर बेतते व नंतर अचानक अकल्पित त्यांची सुटका होते, तसलाच रोमांचकारी प्रकार विष्णुदास-नाम्याच्या या दोन्ही कथानकांत घडतो. परंतु आधुनिक रहस्यकथालेखकांपेक्षाही विष्णुदासनामा काकणभर अधिकच सरस ठरावा ! कारण आधुनिक रहस्यकथांतले नायक-नायिका आपल्या मित्रांच्या किंवा सह-कार्‍यांच्या साहाय्याने सुटका करून घेतात तर विष्णुदासनाम्याच्या या रहस्यमय कथा-नकात नायिकेमुळेच नायकांची सुटका होते ! पांडवांवर बालकांच्या वधाचा आरोप येणे, त्यांच्यावर सुळी जाण्याची आपत्ति कोसळणे, त्या संकटातून ते सुटतात न सुटतात तोच अरण्यपुराच्या भयानक जंगलात त्यांचे तालकेतू दैत्याच्या हाती पडणे, नारायणाने विप्राच्या रूपाने येऊन त्यांची केलेली सुटका, व स्वतः अदृश्य होणे, पुनः एकटी द्रौपदी अचानक तालकेतूच्या हाती पडून भीमाच्या हातून तिची सुटका होणे, अशी त्याच्या कथानकाची

---

१ नामा पाठक : अश्वमेघ पर्व ( तंजावर हस्तालिखित क्रमांक ११८९ ) प्रसंग ७, ओव्या ३० ते ५८ पहाव्या

रहस्यमय गुंफण कदाचित आजच्याही रहस्य-मालांना लाजवेल !

परंतु हा कथाभाग कितीही रोमांचकारी वाटत असला तरी तो या पर्वात वर्णन करणे अप्रशस्त ठरते. स्वर्गारोहण पर्वाचा स्थायी-भावच मुळी गांभीर्याचा आहे. ज्यांनी युद्ध गाजविले, ते महाप्रतापी पांडव, धर्मराज सोडल्यास, एका पाठोपाठ एक धरणीवर कोसळून पडतात, धर्मराजालाही व्याजरूपाने का होईना, परंतु नरकाचे दर्शन घ्यावेच लागते ! हा सर्व भाग वाचकांच्या मनांत गंभीरता उत्पन्न करीत असतो. आणि त्या गांभीर्याची घटना श्रीकृष्णासारख्या महान अवतारी पुरुषाच्या झालेल्या महाप्रस्थानाच्या पार्श्वभूमीमुळे वाढत असते. या सर्वांचा वाचकांच्या मनावर असा परिणाम होतो की, त्यांचे मन उदात्त भावांनी भरून येते, उदात्त पातळीवर वावरू लागते ! विष्णुदासनामा या ठिकाणी, वीर, अद्भुत व रहस्यात्मकता या सर्वांची गुंफण करून, वाचकांच्या मनात उदात्त भावानी निर्माण होणाऱ्या शांत रसाचा बेरंग करून सोडतो !

भीमाने राक्षसांना ठार मारल्याचे ऐकून धर्मराजास फार दुःख होते. या पापातून मुक्त कसे व्हावे याचे त्यास कोडे पडते. तेव्हा, 'काशीस जाऊन शंकराचा सल्ला घ्यावा व तो सांगेल तसे करावे ' असे द्रौपदी त्यास सांगते. तिची कल्पना पसंत पडल्यामुळे पांडव काशीत येतात. तेथे मनकर्णिका नदीत स्नान करून ते आपल्या पितरांना पिंडप्रदान करतात. आपल्याकडे पापी पांडव येत आहेत हे पाहून शंकर काशीतून पलायन करून बदरीकेदारी येतो व म्हशींच्या कळपात दडून बसतो. परंतु धर्मराज व भीम मात्र त्याला म्हशींच्या कळपात दडलेला पाहतात. तो पळून जाऊ नये म्हणून भीम आपल्या बाहूंनी तो म्हशींचा कळप थोपवून धरतो. शंकराचा आता नाइलाज झाल्यामुळे तो प्रगट होतो. तेव्हा ते सहीजण त्याला नमस्कार करतात. तदनंतर धर्मराज त्यास पातकातून मुक्त होण्याचा मार्ग विचारतो, त्या वेळेस आश्वासन देत शंकर त्यांना म्हणतो—

" माझे दर्शन होताच तुम्ही पावन झाला आहात ! आता तुम्ही हिमालय पर्वतावर जा. गिरी दुर्गम आहे. अन्य मार्ग नाही ! म्हणून वैकुंठ सोडून स्वतः देव पर्वतमाथ्यावर येऊन तुम्हांस मार्ग दाखवेल. मात्र तेथे पुण्यदेहीच लोक जातील व इतर लोक मार्गातच खचतील ! " असे सांगून शंकर गुप्त होतो[1].

व्यासमहाभारताच्या कोणत्याही प्रतीत हे कथानक आलेले नसून विष्णुदासनाम्याने ते अन्य ठिकाणाहून घेतले असावे, असे वाटते. या कथानकावरून विष्णुदासनाम्याच्या मनावर अहिंसेची पकड किती जबरदस्त बसलेली होती, हे दिसून येते. अहिंसेच्या अतिरेकी प्रेमाची दृष्टी, ही अमहाभारतीय असून ती जैनांची असावी असे वाटते. कारण जिनसेनाने, हरिवंशपुराणात, कौरव-पांडवांची कथा सांगताना, कौरव व कर्ण जैनधर्मी बनले असून पांडवांनीसुद्धा शेवटी सर्वस्वाचा त्याग करून निर्वाणाचा मार्ग पत्करला, असे वर्णन केल्याचे आढळते[2] !

विष्णुदासनामा यानंतर पांडवांच्या महा-यात्रेचे वर्णन करतो. शंकराच्या आदेशानुसार पांडव महायात्रेस निघाले असता, मार्गात त्यांना आरोहण करण्यास कठीण असा दुर्गम गिरी लागतो. तो पाहून पुढील प्रवासाची धर्मास चिंता पडते. तेव्हा द्रौपदी श्रीकृष्णाचा धावा करू लागते. तो धावा ऐकून वैकुंठाहून श्रीहरी गिरिमाथ्यावर येऊन त्यांना पाचारण

---

१ वि. ना. स्वर्गा. प्रसंग ५ वा, ओव्या १ ते ३१

२ संस्कृत साहित्याचा सोपपत्तिक इतिहास : डॉ. वि. वा. करंबेळकर; पान १६६

करतो. त्याचे शब्द ऐकून पांडवांना धीर प्राप्त होतो व ते पुढे चालू लागतात.

महाप्रस्थानात द्रौपदीचा देह प्रथम खचतो. सहदेव ही वार्ता धर्मास सांगतो. सर्व पांडव तिच्याबद्दल शोक करीत पुढे चालले असता सहदेव मार्गात कोसळतो. हे वर्तमान नकुल धर्मास सांगतो. तदनंतर भीम अर्जुनाला नकुल मार्गात पडल्याचे सांगतो. नंतर अर्जुन कोसळल्याची माहिती भीम धर्माला देतो. पुढे भीम पण खाली पडतो! या सर्व लोकांबद्दल शोक करीत धर्मराज आपला मार्ग पुढे क्रमू लागतो[1].

विष्णुदासनामा वर्णन करीत असलेला हा कथाभाग, जरी व्यास महाभारताच्या महाप्रस्थानिक पर्वावर आधारित असला तरी त्यातील पुष्कळसा भाग त्याने स्वतंत्र रीत्या सुद्धा वर्णन केलेला आहे. धर्म सोडून, बाकीचे चार पांडव व द्रौपदी जमिनीवर कोसळल्याचे जे वर्णन विष्णुदासनामा करतो, तेवढाच भाग महाभारतावर आधारित आहे.[2] त्यातही कोसळणाऱ्या लोकांची माहिती धर्माला, प्रथम सहदेव, नंतर नकुल व तदनंतर भीम देत असल्याचे, जे विष्णुदासनामा आपणांस सांगतो ते महाभारतास धरून नाही. महाभारतात प्रथमपासून ते शेवटपर्यंत भीमच ही माहिती युधिष्ठिराला देत असतो, असे वर्णिलेले आहे.[3]

तसेच विष्णुदासनाम्याने, कठिण मार्ग पाहून धर्मास पडलेली चिंता, द्रौपदीने केलेला धावा, व वैकुंठ सोडून नारायणाचे गिरिमाथ्यावर आगमन, इत्यादि जो भाग वर्णन केलेला आहे तोही महाभारतास अनुसरून नाही. पांडवांना शंकराने जे आश्वासन दिलेले होते, ते प्रत्यक्षात अवतरले हे दाखविण्यासाठी[4] व कथेचे मागील सूत्र कायम ठेवण्यासाठी कदाचित त्याने हा भाग वर्णिला असावा असे वाटते.

आपले सर्व बांधव आणि आपली सहधर्मचारिणी मार्गात खचल्याचे पाहून धर्माला अतिशय वाईट वाटते. त्याच्या मनात आत्महत्येचे विचार घोळू लागतात! परंतु आत्महत्या केल्यास वैकुंठात थारा मिळणार नाही म्हणून तो नाइलाजाने पुढील मार्ग आक्रमू लागतो. त्या वेळेस त्याच्या पायाचा अंगठा गळून पडतो! विष्णुदासनाम्याचे या वेळचे कथावर्णन प्रत्यक्षच बघणे इष्ट ठरेल. तो म्हणतो—

जरि करू आत्मघात :
तरि मज वैकुंठी ठाव नेदि अनंत :
तव धर्माचा कापत अंगुष्ट :
वामचरणिचा ॥ १० ॥
धर्म जव अंगुष्ठ पाहे :
तव तो गळोनि पडिला आहे :
तया दुःखे धर्म पाहे :
जाला कासाविस ॥ ११ ॥

आपला अंगठा का गळून पडला असावा? याचा विचार जेव्हा धर्म करू लागला तेव्हा त्याला जे उत्तर सुचले ते म्हणजे—

म्या पाप केले कोण :
का अंगुष्ट गेला गळोन :
द्रुपदि म्हणिजे विघ्न :
उदेले होते आम्हा ॥ १४ ॥
तिचा अभीलाश मुळीहून :
करितसे दुर्योधन : नाना कपटे करून :
आम्हासि वैर तिच्या दुःखे ॥ १५ ॥
तयेचा साभीमानि :
अहंता धरिली चौघीजाणि :
बंधु कौरव मारुनि :
राज्य घेतले बळेचि ॥ १६ ॥
त्या पातकास्तव पाहे :
त्यांचे खचले असति देहे :

---

१ वि. ना. स्वर्गा. प्रसंग ५, ओव्या ७० ते १२५  २ म. भा. १७. २. १ ते २६.
३ तत्रैव श्लोक ४ ते २४  ४ वि. ना. स्वर्गा. प्रसंग ५, ओव्या १ ते ३१

मजही पातक आहे :
संगे जडले तयाचेनि ॥ १७ ॥
माझी म्हणउनि धर्म धरिला :
नर वा कुंजर बोलो बोला :
म्हणउनि हा झडला :
अंगुष्ठ माझा ॥ १८ ॥

या ठिकाणी विष्णुदासनामा आपणांस जी माहिती सांगतो ती अमहाभारतीय आहे. महाभारतामध्ये या चार पांडवांच्या आणि द्रौपदीच्या पतनाची जी कारणे दिलेली आहेत, ती भिन्न आहेत. द्रौपदी अर्जुनाची पक्षपाती असल्याने पडली, सहदेवाला आपल्या सूज्ञपणाचा, नकुलाला आपल्या सौंदर्याचा गर्व झाला व ते पडले. अर्जुन सर्व धनुर्धरांचा अपमान करीत असे, त्याशिवाय 'एका दिवसात मी सर्व शत्रूंना जाळून टाकीन' अशी त्याने केलेली प्रतिज्ञाही तो पुरी करू शकला नाही, यास्तव तो पडला आणि अतिशय खादाडपणामुळे आणि शक्तीच्या घमेंडीमुळे भीमही खाली पडला; असे वर्णन महाभारतात येते[१].

धर्मराजाच्या पायाचा अंगठा गळल्याचा उल्लेखसुद्धा महाभारतात येत नाही.

विष्णुदासनाम्याने येथे उभे केलेले धर्मराजाचे चित्र त्यास अन्यायकारक ठरणारे असून, ते अमहाभारतीय आहे. या वर्णनावरून, द्रौपदीकडे बघण्याचा धर्माचा दृष्टिकोन अत्यंत अनुदार होता, अशी आपली स्पष्ट कल्पना होते. द्रौपदी आपल्या मार्गातील एक विघ्न असून, तिच्यामुळेच आपण आपल्या कौरवबांधवांना ठार मारले, असे धर्मराजास कधीही वाटले नाही. दुर्योधन द्रौपदीची अभिलाषा धरीत होता, ही गोष्ट खरीच ! परंतु एकदा तिला पणात जिंकून घेतल्यानंतर आणि स्वयंवर झाल्यानंतर, धर्माला, दुर्योधनास काय वाटत होते, याचा विचार करण्याची जरूरीच राहिली नव्हती ! धर्मराज जर सुज्ञ समजला जात होता तर त्याने समजून उमजूनही हे विघ्नाचे धोंगडे गळ्यात का बांधून घेतले ? तसेच द्रौपदी हे हानीकारक विघ्न आहे असे जर त्याला वाटत होते तर त्याने बाकीच्या चार पांडवांना, या विघ्नापासून दोन हात दूर का ठेवले नाही ?

पांडवांचे सर्वस्वापहरण होऊन वस्त्रहरण झाले असता, जिने नावेच्या रूपाने त्यांना द्यूतार्णवातून तारून पैलतीरी नेले; तिने तेरा वर्षांचा वनवास वणवण करीत, अत्यंत हालअपेष्टा सहन करून, आपल्या पतींबरोबर आनंदाने सोसला; दुर्वासासारख्या महाक्रोधी तपस्व्याच्या हातून पांडवांचे सत्त्वहरण होऊन त्यांच्यावर भस्मीभूत होण्याचा दुर्धर प्रसंग कोसळला असता, जिने त्यांची लाज राखली; इतकेच नव्हे तर जिने, स्वतः साम्राज्ञी असतानासुद्धा, पतींच्याकरिता सैरंध्रीही बनून आपले शील धोक्यात घातले; अशा महान साध्वी पतिव्रतेला, धर्माने 'विघ्न' म्हणून हेटाळणे अत्यंत कृतघ्नपणाचे ठरते ! व्यासमहाभारतात मात्र असा अनुदार धर्म आपल्या समोर उभा राहत नाही. कारण आपणांस भारतामध्ये, द्रौपदीबद्दल धर्मराजाने चांगले उद्गार काढलेले पाहावयास मिळतात. सभापर्वात धर्म म्हणतो[२] —

"पुरुष ज्या स्त्रीची इच्छा करील, तिचे दयाळुत्व, रूप व शीलसंपत्ती लक्ष्मीसारखीच असावी व ती लक्ष्मीसारखीच सर्वगुणसंपन्न, पतीला अनुकूल, प्रिय भाषण करणारी व साक्षात धर्मार्थकामसिद्धी देणारी असावी ही पांडवपत्नीही तशीच आहे. आमची कृष्णा सर्वांच्या मागून निजते व सर्वांच्या आधी उठते. बाल- गोपालांपर्यंत कोणते कार्य झाले व कोणते अवशिष्ट आहे, हे स्वतः समजून घेते."

१ म. भा. १७.२. ३ ते २५ २ म. भा. २.५८. ३३ ते ३७

या ठिकाणी धर्मराजाने तिच्याबद्दलचा आपला अभिमान व प्रेम अत्यंत चांगल्या रीतीने व्यक्त केलेले आहे. याचप्रमाणे महाप्रस्थानिक पर्वातसुद्धा, युधिष्ठिराने द्रौपदीबद्दल चांगले उद्‌गार काढून आपल्याबरोबर तिला स्वर्गात नेण्याची संमती इंद्राजवळ मागितलेली आहे[१]. तसेच भीमादि पांडवांबरोबर तिलाही नरकात खितपत पडल्याचे पाहून त्याला मोठे दुःख झाले होते[२], हे व्यासांनी वर्णिलेले आहेच. ती जर त्याला विघ्नाप्रमाणे वाटत असती तर तिच्याबरोबर तो नरकात राहावयास तयार झाला नसता किंवा तिला स्वर्गात नेण्याचा आग्रह त्याने धरला नसता! अशा प्रकारे महाभारतात धर्माने कोठेही द्रौपदीबद्दल अनुदार उद्‌गार काढलेले आढळत नसल्याने, विष्णुदासनाम्याने मात्र धर्माचे चित्र अनुदार काढून, महाभारतातील धर्मराजावर अन्याय केलेला आहे, हे स्पष्ट होते.

अशा रीतीने पायांचा अंगठा निखळल्यामुळे अत्यंत व्याकूळ होत धर्मराज पुढे जाऊ लागतो. बारा योजने पुढे गेल्यावर त्याला वाटेत खदिरांगारासारखी दिसणारी इंगळा नावाची नदी लागते. ती रुधिरकाय असून तिच्यामधून अग्नीच्या धगधगीत ज्वाला बाहेर पडत असतात. त्या नदीला, धर्मराज शंकराचा तृतीय नेत्र मानतो व पुढे जाऊ लागतो.

पुढील मार्ग आक्रमीत असता, इंद्र श्वानाचे रूप घेऊन त्याच्या मार्गात आडवा येतो. त्या कुत्र्याच्या अंगावर लूत पडलेली असते, तिच्यातून लस वाहत असून गोमाशा घोंगावत असतात; त्याच्या माथ्याला एक घाव पडलेला असून त्यांत जंतू व किडे वळवळत असतात. त्या कुत्र्याची सर्वत्र दुर्गंधी सुटलेली असते. धर्माला त्या कुत्र्याची अवस्था पाहून अत्यंत दया येते; व कृपेने त्याला तो कवटाळतो. नंतर त्याच्या डोक्यावर असलेल्या जखमेतील किडे व जंतूसुद्धा तो काढून टाकतो. अदृश्य रूपाने देव धर्माचे हे कृत्य बघत असतात. त्यांना धर्माची सहृदयता पटते व त्याला स्वर्गात नेण्यासाठी पुष्पक विमान पाठविले जाते. धर्म त्या विमानात कुत्र्यासह बसू लागतो, परंतु देवदूत त्याला हरकत घेतात. तेव्हा कुत्र्याला टाकून स्वर्गात येण्यास धर्म नकार देतो. धर्माचा निश्चय पाहून इंद्र प्रगट होतो. नंतर धर्मराज त्याला अभिवादन करतो.

विष्णुदासनाम्याने या ठिकाणी वर्णिलेला हा कथाभाग बहुतेक स्वतंत्ररीत्या रचिलेला असावा. या भागात, त्याने, कुत्र्यासह धर्मराजाचे स्वर्गात जाण्याबद्दलच्या आग्रहाचे जे निवेदन केलेले आहे, तेवढाच भाग व्यासमहाभारतावर आधारित आहे. परंतु व्यासमहाभारतात हा उल्लेख स्वर्गारोहण पर्वात न येता तो महाप्रस्थानिक पर्वात येतो[३]. या भागातसुद्धा त्याने, श्वानाचे जे वर्णन केलेले आहे, ते महाभारतातील नसून स्वतंत्र असावे, असे वाटते.

देवदूतांना धर्मराजास कोणत्या मार्गाने स्वर्गात न्यावे याचा विचार पडतो. त्यांची आपापसात चर्चा होऊन त्याला शुद्ध मार्गाने स्वर्गात नेऊ नये असे ठरते. कारण धर्मराजाला अप्रत्यक्षपणे हिंसादोष जडलेला असतो!

एक अत्यंत निर्धन कोळी असतो. अन्न मिळण्याची त्याला अत्यंत मारामार पडते. एके दिवशी, अत्यंत क्षुधापीडित झाल्याने तो

---

१ म. भा. १७.३. ३ ते ४

२ म. भा. १८.२. ४३ ते ५२

३ म. भा. १७.३. ७ ते १५

धर्मराजाकडे अन्नाची याचना करण्यासाठी येतो. धर्माला त्याची दया येते, व तो त्याला एक सोनटक्का देतो. धीवराला ते नाणे मिळाल्यामुळे अत्यंत हर्ष होतो. त्या धनाने तो सूत विकत घेऊन त्याचे जाळे विणतो. नंतर ते जाळे घेऊन तो मासे मारण्यासाठी जातो, आणि असंख्य मासे मारतो. धर्माने धन दिल्यामुळेच त्या कोळ्याला मासे मारता आले म्हणून धर्माला हिंसेचा दोष लागतो! हिंसकाला नरकप्राप्ती असते, म्हणून देवदूत त्याला द्वादश योजने पसरलेल्या 'कुंभपाक' नावाच्या यमपुरीवरून नेऊ लागतात. मार्गातील दुर्गंधी धर्मराजाला असह्य होते म्हणून आपणांस या मार्गाने का नेले जात आहे याची पृच्छा तो देवदूतांजवळ करतो. तेव्हा ते त्याला हिंसादोषाचे कारण समजावून सांगतात.

तदनंतर धर्मराज देवदूतांना, 'आपले दर्शन घेतल्यास तुम्हांस मुक्ती मिळेल, म्हणून तुम्ही काठावर यावे' असा निरोप, कुंभपाकातील लोकांना कळविण्यास सांगतो. त्याप्रमाणे देवदूत तो निरोप त्या लोकांना कळवितात. कुंभपाक नरकातील लोकांना तो निरोप ऐकल्यावर फार हर्ष होतो. ते काठावर येऊन त्याचे दर्शन घेतात व मुक्त होतात. परंतु दुर्योधनास मात्र निरोप ऐकल्यावर दुःख झालेले असते, म्हणून तो वर येत नाही. त्याची वाट बघत धर्मराज काठावरती सहा महिने उभा असतो! शेवटी, श्वास घेण्यास्तव जेव्हा दुर्योधन वरती येतो तेव्हा त्यास धर्माचे दर्शन घडते व तो तत्काळ मुक्त होतो! तदनंतर धर्मराजास भेटण्यासाठी श्रीकृष्ण येतो. त्याच्या मागोमाग भीम, अर्जुन, नकुल, सहदेव, आणि द्रौपदी पण त्याला येऊन भेटतात. या सर्वांचे देह पुनीत झालेले असतात म्हणून त्यांनाही वैकुंठवास लाभतो. त्यांच्या आगमनाने वैकुंठात सर्वत्र आनंदीआनंद होतो.

या कथाभागात, विष्णुदासनामा धर्मास लागलेल्या हिंसादोषाचे जे वर्णन करतो, त्यास महाभारताचा आधार नाही. तसेच धर्माला नरकात का नेले जाते त्याचे कारण हे नसून ते भिन्न आहे. त्याचा उल्लेख या लेखाच्या सूत्रारंभात आलेला आहेच. तसेच येथे विष्णुदासनामा, दुर्योधनाला मुक्ती कशी मिळाली याबद्दल जे कथानक सांगतो ते ते अमहाभारतीय असून त्यास कथाकल्पतरूचा मात्र आधार सापडतो.[1] परंतु तेथेही, हे कथानक भिन्न रीतीने वर्णिलेले असून, दुर्योधनाला मात्र, तो वर न आल्याने मुक्ती मिळाली नाही असे सांगितलेले आहे.

विष्णुदासनाम्याचे स्वर्गारोहणपर्व येथे समाप्त झाल्याने त्याचा तौलनिक अभ्यास संपलेला आहे. परंतु हा अभ्यास होत असताना एक भाग मुद्दाम मागे ठेवलेला होता, त्याचे विवेचन या ठिकाणी स्वतंत्र रीतीने करीत आहे. हा भाग, स्वर्गारोहणपर्वात, मृतब्राह्मण जिवंत होत असल्याच्या येणाऱ्या उल्लेखाबद्दलचा होय. विष्णुदासनाम्याच्या इतर भारती पर्वातसुद्धा हा उल्लेख आपणांस आढळतो.

उदाहरणार्थ उद्योगपर्वात विष्णुदासनामा म्हणतो[2]—

वैशंपायण म्हणे गा भारथा
राया परीक्षिती सुता।
परीस तु पूर्वजाची कथा।
तरी तेणे ब्रह्महत्या महादोष नाशती॥

तव म्हणे परीक्षीती सुत।
जी हे वचन येथार्थ।
जे पर्वी ब्राह्मण उठे मृत्य।
कापड एक हात शुद्ध होय॥

---

१ कथाकल्पतरू स्तबक १४ वा अध्याय २७ पान ३४०

२ भा. इ. सं. मं. अहवाल शके १८३२; पाने ३४ ते ३६ (उद्योग ते कर्णपर्वासाठी)

शेवट—

ऐसे ऋषी बोलिला ।
तव रवी अस्तमाना गेला ॥

रावे पाहे तव मृत्य ब्राह्मण उठिला ।
कापड शुद्ध जाले एक हात ॥

असाच उल्लेख भीष्मपर्वात सुद्धा आढळतो—

ऐसा बोलिला वैशंपायन ।
तव सविता झाला अस्तमान ॥
प्रेतीतील उठिला ब्राह्मण ।
कापड जाले शुद्ध हात ॥

भीष्मपर्वातील उल्लेखाप्रमाणेच द्रोणपर्वात तो उल्लेखितो—

असे ऋषी बोलिला वचन ।
तव रवी झाला अस्तमान ॥
मृत्यजा उठले ब्राह्मण ।
कापड जाले शुद्ध हात ॥

भारतीकथेच्या श्रवणाच्या प्रचीतीबद्दल कर्णपर्वात तो सांगतो—

ऐसे ऐकोनी वचन ।
थोर हरुपला परीक्षितीनंदन ॥
म्हणे साच जी वचन ।
तुमचे स्वामिया ॥

जी प्रत्यही प्रचीत ।
मग असे जी होत ॥
मृत्य ब्राह्मण उठत ।
कापड हात शुद्ध होय ॥

स्वर्गारोहण पर्व, भारताचे शेवटचे पर्व. तेव्हा त्यात या कथासूत्राचा शेवट व्हावयास हवाच. तो करीत असताना विष्णुदासनामा म्हणतो[1]—

ऐसी ही भारतीची कथा ।
येथुनी ग्रंथ जाला समाप्ता ।
स्वर्गारोहण सरता ।
अठरा पर्वे जाली येथून ॥ १ ॥

हे पुण्यपावन कथा ।
व्यासे सांगितली परीक्षितिसुता ।
म्हणोनि अठरा ब्रह्महत्या ।
गेल्या जनमेजयाच्या ॥ २ ॥

मग तो रावो करी काये ।
ऋषी षोडश उपचारी पूजिला है ।
चरण वंदुनी विनवीताहे ।
म्हणे उत्तीर्ण काय होऊ ॥ ३ ॥

जी मज दोषावेगळे केले ।
पातकापासुनि सोडवीले ।
ऐसे म्हणोनि ऋषीस बहुडवीले ।
राये जनमेजये ॥ ४ ॥

जनमेजय राजाला अठरा ब्रह्महत्त्यांचा दोष जडला होता. त्या पातकातून मुक्त होण्यासाठी व्यासांनी त्याला महाभारताचे वाचन करण्यास सांगितले. एक पर्व संपले की, एक ब्राह्मण जिवंत होई. अशा प्रकारे महाभारताच्या अठरा पर्वांचे वाचन झाल्यावर अठराही ब्राह्मण जिवंत झाले व जनमेजय राजा दोषमुक्त झाला, हे कथासूत्र विष्णुदासनाम्याच्या महाभारतातील अठरा पर्वांत गोवलेले आहे, हे वरील उताऱ्यावरून स्पष्ट होईल.

विष्णुदासनामा या ठिकाणी ज्या जनमेजय राजाचा उल्लेख करतो तो महाभारतातील जनमेजय राजा नसावा. कारण महाभारतात राजाला अठरा ब्रह्महत्त्यांचे पातक लागल्याचा उल्लेख कोठेही येत नाही. एका जनमेजय राजाला, गार्ग्यांचा अल्पवयीन मुलगा लोहगंध ठार मारल्याबद्दल शाप मिळाला व त्या शापातून तो, अश्वमेध करून मुक्त झाल्याची

१ नवे नवनीत : १२६

कथा आढळते. परंतु ती निरानिराळ्या पुराणांत सांगितलेली आढळते.[१] जनमेजय परीक्षिताने केलेल्या ब्रह्महत्त्येचा उल्लेख महाभारताच्या शांतिपर्वात आढळतो.[२] परंतु त्याचा भारतीय युद्धाशी काही संबंध नाही, असे कै. चिं. वि. वैद्य मानतात[३]. भाण्डारकर प्रतीतसुद्धा हा जनमेजय भिन्न मानलेला आहे. तेथे जी टीप दिलेली आहे[४] ती अशी—

The Janamejaya of the following story (adhy. 146–148) is to be distinguished from the well-known Janamejaya at whose sarpa-sattra, Vaisampayana recites the Mahabharata, and also probably from the Janamejaya alluded to in 12. 124. 16b

भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोशातसुद्धा, अश्वमेध यज्ञ करून मुक्त होणारा जनमेजय कोण असावा, हे कळत नाही असे ध्वनित केलेले आहे.[५] महाभारतीय कोशकार एस्. सोयरेन सेन यालासुद्धा हा जनमेजय राजा भिन्न असावा असे वाटते.[६]

अशा प्रकारे विष्णुदासनामा वर्णन करीत असलेले हे कथासूत्र महाभारतात आढळत नसल्याने ते त्याने स्वतंत्रीत्या रचिलेले असावे, असे लोकांना वाटणे संभवनीय आहे. उदाहरणार्थ या कथासूत्राबद्दल विवेचन करताना, एका विवेचनात्मक अभ्यासात म्हटले आहे.[७] "हे कथासूत्र म्हणजे महाभारत कथनाचा एक महत्त्वपूर्ण हेतूच होय. मूळ महाभारत यज्ञप्रसंगी कालक्षेप करण्यासाठी रचिले गेले. परंतु विष्णुदासनामा त्याची निराळीच पण वैशिष्ट्यपूर्ण उपपत्ती लावतो. ते ब्रह्महत्त्येच्या पापाचे परिमार्जन करण्यासाठी निवेदिले गेले, असे तो प्रतिपादन करतो. महाभारताच्या श्रवणाने अनेक पापे नष्ट होतात व ब्रह्महत्त्येच्या पापाची निष्कृती होते, असे त्याने आवर्जून सांगितले आहे. त्याच्या महाभारतात, इतर कोणत्याही महाभारताच्या मराठी अनुवादात न आलेला हा उल्लेख पुन्हा पुन्हा येतो. प्रत्येक पर्वाच्या शेवटी एक मृत ब्राह्मण जिवंत होतो व एक हात वस्त्र पांढरे शुभ्र होते, असा निर्देश सापडतो. हे उल्लेख निरनिराळ्या भागांतील हस्तलिखित प्रतींतही आढळतात. त्यावरून ते ह्या महाभारताचा एक महत्त्वपूर्ण वेगळेपणाच प्रस्थापित करतात, असे म्हणावयास हरकत नाही." या उताऱ्यात, विष्णुदासनामा वर्णित असलेले कथासूत्र, त्याचे स्वतःचे असून ते महाभारताच्या इतर मराठी अनुवादांत आलेले नाही, हे ध्वनित केले गेलेले विधान चिन्त्य आहे.

या विधानाचा योग्य परामर्श घेण्यासाठी प्रथम हे अठरा हत्यापातकांचे कथानक इतरत्र कोठे आढळते का हे पाहिले पाहिजे. कृष्णदासाने वनपर्वामध्ये अशा प्रकारचा उल्लेख केलेला आढळतो. तो म्हणतो[८]—

---

१ प्राचीन चरित्रकोश : पान १९३

२ म. भा. शांतिपर्व (आपद्धर्म पर्व) अध्याय १४६ ते १४८.

३ श्रीमन्हाभारत उपसंहार : भाग १० वा. (द्वितीयावृत्ती १९२२) पान ११६.

४ म. भा. शांति–आपद्धर्म पर्व पान ९३९ अध्याय १४६ वरील टीप पाहावी

५ भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश. कै. र भा. गोडबोले(१९२८)पान१४०(क्र.७.)

६ An Index to the names in the Mahabharata : Page 353

७. विष्णुदासनाम्याच्या भारताचा विवेचनात्मक अभ्यास : पान ३३ (डॉ. सरोजिनी शेंडे)

८ तत्रैव; पान ३५

तू चित्त देउनि आइके ।
जाति अटराही पातके ।
आसत्य काही इतुके ।
मानु नको ॥ वनपर्व ११७.

असाच उल्लेख कृष्णदासाच्या रुक्मिणी-स्वयंवरात पण येतो[१]. तो असा—

अठरा हत्त्या फिटल्या त्वरित ।
जन्मोजयाचिया ॥ प्रसंग १ ला.

परंतु कृष्णदासाने केलेल्या उल्लेखाबद्दल डॉ. सरोजिनी शेंडे म्हणतात की, कृष्णदासाने केलेल्या ह्या उल्लेखात विष्णुदासनाम्याचेच ऋण उघड उघड दिसते. कदाचित वनपर्वामध्ये त्यांना अशा प्रकारचा एकच उल्लेख आढळला असल्यामुळे त्यांची अशी समजूत झाली असेल! परंतु कृष्णदास वनपर्वातच आणखी दोन ठिकाणी तसा स्पष्ट उल्लेख करतो. ते उल्लेख असे—

तया पांडवांचे पवाडे :
आइकता पवीत्र आनि गाढे :
अठरा हत्त्येचे दोष रोकडे :
जन्मोजयाचे गेले ॥ प्रसंग १ ला. ओवी १२

किंवा

हे आरन्ये पर्वीची कथा :
वैशंपाएण होए सांगता :
जन्मोजयो होए परीसता :
ब्रह्महत्या फीटावया ॥ प्रसंग ३ रा. ओवी २७५.

एकाच पर्वात कृष्णदास जनमेजयाच्या या ब्रह्महत्त्येचा इतक्या वेळा पुनरुच्चार करतो की, त्यामुळे हे कथासूत्र त्यानेच प्रथम आपल्या भारतात घेतले असून तदनंतर ते विष्णुदासनाम्याने उचलले असावे असे वाटते.

तसेच वनपर्व रचणारा, महाभारतकार कृष्णदास, विष्णुदासनाम्याच्यानंतर झाला, हे त्या कसे समजतात, हेही कळत नाही. प्रथमतः कृष्णदास नावाचे अनेक रचनाकार होऊन गेल्याने, तो एक वादग्रस्त प्रश्न बनलेला आहे. कै. वि. ल. भावे, महाभारतकार कृष्णदास एकनाथ-समकालीन होऊन गेला, असे मानतात[३]. पांगारकर त्याचा काल, शके १४७० ते १५३५ चा,( म्हणजे एकनाथसमकालीनच ) समजतात[४]. डॉ. तुळपुळे यांचेसुद्धा मत पांगारकरांप्रमाणेच आहे.[५] तेव्हा जर कृष्णदास इ. स. १६१३ च्या आसपास मृत झालेला असेल तर इ. स. १६३३ मध्ये महाभारत रचणाऱ्या विष्णुदासनाम्याचा तो ऋणी कसा ठरतो? विष्णुदासनाम्याने आपले भारत इ. स. १६३३ पर्यंत रचिले असावे, असे डॉ. सरोजिनी शेंडे मानतात[६].

परंतु कृष्णदास ही एक विवाद्य व्यक्ती आहे असे समजून, जरी आपण क्षणभर त्याचा विचार बाजूस सारला तरीही विष्णुदासनाम्याच्या आधी महाभारतावर रचना करणारा एक कवी होऊन गेल्याचे नजरेस पडतेच! परंतु कै. पांगारकरादि प्रभृति संशोधक व्यक्तींनी, त्याचे नाव मराठी महाभारताच्या अवतारात न दिल्याने अजूनपर्यंत तो लोकांच्या लक्षात आलेला नाही! हा महाभारतकार कवी मधुकर होय! कथाकल्पतरू हा ग्रंथ कृष्ण याज्ञवल्कीने अपूर्ण ठेवला होता तो मधुकराने उत्तरार्ध लिहून पूर्ण केला. कथाकल्पतरूच्या पूर्वार्धाचे सात स्तबक भागवतामृताचे आहेत तर उत्तरार्धाचे सात स्तबक भारतामृताचे आहेत. या उत्तरार्धात, मधुकराने महाभारतातील पर्वावर क्रमशः रचना केलेली आहे. जनमेजयास अठरा ब्रह्महत्यांचा

---

१ नवे नवनीत. पान १२६ तळटीप

२ विष्णुदास नाम्याच्या भारताचा विवेचनात्मक अभ्यास पान ३५

३ म. सा. पान ३१९

४ म. वा. इ. खंड २ रा. पान ५९९

५ म. सा. पान ९३४

६ विष्णुदासनाम्याच्या भारताचा विवेचनात्मक अभ्यास. पान ११

दोष लागून, महाभारताच्या वाचनाने तो त्या पातकातून मुक्त झाला व अठरा ब्राह्मण पुनरपि सजीव झाले, हे कथानक, कथाकल्पतरूत समग्र वर्णिलेले आहे[1]. मधुकर कवीने कथाकल्पतरू इ. स. १६२३ मध्ये समाप्त केला. या कालानुसार, मधुकराने विष्णुदासनाम्याच्याहीपूर्वी भारतावर रचना केलेली आहे हे स्पष्ट होते.

विष्णुदासनाम्याच्या भारताचा काळ ( इ. स.१६३३ पर्यंतचा ) ठरविताना डॉ.सरोजिनी शेंडे, फ्रॉंसिस्कु गार्सिय याचा आधार घेतात. या पाद्र्याचे वास्तव्य १६०२ ते १६३३ मध्ये हिंदुस्थानात होते. इ. स. १६३३ त तो दक्षिणेत गेला व इ. स. १६५९ साली तो क्रागानोरच्या आर्चबिशपच्या जागी असता मरण पावला[2]. या पाद्र्याने हरिश्चन्द्रपुराणाची पोर्तुगीज भाषेत नक्कल करून ठेविलेली आहे. या पोर्तुगीज भाषांतरावरून त्या विष्णुदासनाम्याचा काल ठरवितात ! वस्तुतः या विधानावरही अनेक आक्षेप घेता येतील ! पहिला आक्षेप असा आहे की, ज्या विष्णुदासनाम्याने हरिश्चन्द्र पुराण लिहिलेले आहे त्याने महाभारत रचिले असेलच कशावरून ? ज्ञानेश्वरांनी भगवद्गीतेवर ‘ भावार्थदीपिका ’ ही टीका लिहिली म्हणून त्यांनी समग्र भारत रचिले, असा तर्क करणे शास्त्रशुद्ध ठरेल काय? दुसरा आक्षेप असा की, ज्या विष्णुदासनाम्याने हरिश्चंद्र पुराण राचिले आहे, तो कवी नामदेव नसेल कशावरून ? नामदेवानेही आख्यानपर रचना केलेली असून तोही स्वतःस ‘ विष्णुदासनामा ’ म्हणवून घेत असल्याचे अभंगांतून दृष्टीस पडते ! यानंतरचा आक्षेप असा आहे की, फ्रॉंसिस्कु गार्सिय याने हरिश्चन्द्र पुराणाचा पोर्तुगीज अनुवाद इ. स. १६३३ पर्यंतच केला असेल, असे कशावरून ? त्याने तो नंतरच्याही काळात केला असणे संभवनीय नाही का ? डॉ. सरोजिनीचाई शेंडे, विष्णुदासनाम्याने इ. स. १५८० ते १६३३ च्या सुमारास महाभारत व इतर काव्ये रचिली असावीत असे म्हणतात व लगेच पुढे इ. स. १६०९ च्या सुमारास त्याचे महाभारत लिहिले गेले असे विधान करतात ![3] वस्तुस्थिती अशी आहे की, पी. विर्कीच्या मताप्रमाणे, इ. स. १६१० पूर्वी मराठीची भाषांतरे करण्यास फ्रॉंसिस्कु गार्सिय याने सुरवात केली नव्हती व १६३३ मध्ये दक्षिणेत गेल्यावर त्याने हे काम पुरे केले असावे[4]. प्रा. अ. का. प्रियोळकरांच्या मताप्रमाणे त्याने १६१० साली गोव्यात परत आल्यावर मराठीचा अभ्यास जोराने चालविला असावा[5]. इ. स. १६५७ च्या सुमारास त्याने इंक्विझिशनला पाठविलेल्या पत्रात प्रथमच तो आपल्या भाषिक अभ्यासाची माहिती देतो, असे वाटते. तेव्हा मराठीचा अभ्यास नसलेल्या या अनभ्यस्त माणसाकडून हरिश्चन्द्र पुराणाचे भाषांतर इ. स. १६५७ पूर्वी व्हावे हे अशक्य वाटते. जर या ग्रंथास लोकप्रियतेसाठी सुमारे ५० वर्षे लागली असे गृहीत धरले, तर विष्णुदासनामा इ. स. १६०७ च्या सुमाराचा कवी ठरतो व त्यानंतर त्याच्या महाभारताची रचना झाली म्हणजे, ती सुमारे इ. स. १६४० च्या आसपास झाली असे म्हणणे भाग पडते. म्हणजे विष्णुदासनाम्याच्या

---

१ कथाकल्पतरू उत्तरार्ध. स्तबक ८ वा. अध्याय ४ व ५

२ विष्णुदासनाम्याच्या भारताचा विवेचनात्मक अभ्यास : पान ११

३ विष्णुदासनाम्याच्या भारताचा विवेचनात्मक अभ्यास. पान ११

४ मराठी संशोधन पत्रिका : अंक २ रा जानेवारी १९६०. पान १५२. निबंध, टाचणे वगैरे

५ तत्रैव पान १५३. निबंध, टाचणे वगैरे

साहित्यनिर्मितीचा काल त्यांनीच पुढे आणलेल्या पुराव्यानुसार इ. स. १५८० ते १६३३ असा न समजता तो इ. स. १६०७ ते १६५७ च्या आसपासचा मानणे युक्त ठरते*. या काळातील मराठी वाङ्मयात फारसी-उर्दू शब्द सापडतात. विष्णुदासनाम्याचे वाङ्मयही या वस्तुस्थितीस अपवादात्मक नाही. कारण त्याच्या 'कुडी आत्म्याच्या भांडणात', 'अस्मान', 'दिलगीर', 'तमाशा' असे फारसी शब्द येतात.[१]

कृष्ण याज्ञवल्कीच्या कथाकल्पतरूचा काल इ. स. १६२३ असा निश्चित झालेला आहे. त्याशिवाय अल्पावधीतच त्याचा उल्लेख येतिया द ला क्रुआ याच्या पुराणातही झालेला आढळतो.[२] येतिया द ला क्रुआ ह्याने फ्रॅंसिस्कु गार्सिय याच्यापूर्वीच मराठीत रचना करण्याचे काम सुरू केलेले होते. तेव्हा त्याने कथाकल्पतरूचा केलेला उल्लेख, साहजिकच कथाकल्पतरू हा ग्रंथ विष्णुदासनाम्याच्याही पूर्वी समाजात मान्यता पावून लोकप्रिय झाला होता, हेच दर्शवितो.

या सर्व विवेचनावरून विष्णुदासनाम्याने आपल्या भारतामध्ये गोवलेले अठरा ब्रह्महत्त्यांचे कथासूत्र त्याने कथाकल्पतरूमधून घेतले असले पाहिजे हे स्पष्ट होते.

विष्णुदासनाम्याने कथाकल्पतरूमधून हे एकच कथासूत्र घेतले आहे असा भाग नसून त्याने तेथील इतक्या अनेक कथा घेतलेल्या आहेत की, त्यामुळे त्याच्या भारताला, 'कथाकल्पतरूच्या उत्तरार्धाची एक छोटी आवृत्ती'च असे म्हटले असता चालू शकेल! विष्णुदासनाम्याच्या स्त्रीपर्वात (मुंबई प्रतीत), कृष्णदान, श्रीकृष्णाचे ब्रह्मचारित्व, गणपतीवर चौर्याचा आरोप, इत्यादि ज्या कथा आढळतात[३] त्यांपैकी पुष्कळ आपणांस कथाकल्पतरूमध्ये आढळतील! परंतु या कथा महाभारतांतील स्त्रीपर्वात मात्र येत नाहीत. द्रौपदी ही पाच पुरुषांची एकच पत्नी! तेव्हा तिच्याशी एकाचा संबंध आला असता, दुसरा तेथे आल्यास महा अनर्थ ओढवेल! तो टाळावा म्हणून विष्णुदासनाम्याने वर्षाचे दिवस विभागून, प्रत्येक पुरुषासाठी तिची ७२ दिवसांची विभागणी करून तत्संबंधी जो कथाभाग वर्णन केलेला आहे,[४] तो संस्कृत महाभारतात सापडत नाही, परंतु कथाकल्पतरूत मात्र जवळजवळ सारख्याच प्रकारे वर्णिलेला आढळतो[५].

विष्णुदासनाम्याच्या महाभारतावर कथाकल्पतरूचा प्रभाव इतका पडलेला आहे की, त्याचे सर्व गुणदोष आपणांस विष्णुदासनाम्याच्याही भारतात आढळतात. कथाकल्पतरूबद्दल विवेचन करताना कै. वि. ल. भावे म्हणतात[६], 'याच्या कल्पतरूमध्ये एकच खोड आहे. त्याला फळे अपार लागली आहेत.

---

* डॉ. सरोजिनी शेंडे यांनी हा काळ इ. स. १६३३ ह्या सनावरून ठरविलेला आहे. येथे तो इ. स. १६५७ ह्या सनावरून काढलेला आहे

१ म. सं. प. अंक २ रा. जानेवारी १९६०. पान ३५ ते ३७. निबंध, टाचणे वगैरे

२ तत्रैव अंक ३ रा. एप्रिल १९५९ पान १२५. निबंध, टाचणे वगैरे.

३ विष्णुदासनाम्याच्या भारताचा विवेचनात्मक अभ्यास – स्त्रीपर्व, मुंबई प्रतीचा सारांश पाहावा

४ वि. ना. आदिपर्व अध्याय ५५ ओव्या ३१ ते ३६

५ कथाकल्पतरू उत्तरार्ध, स्तबक ८ वा, अध्याय ३०

६ म. सा. पान ३२०

पण त्या फळांना स्वाद नाही. कवीच्या भाषेला चांगलीशी गोडी नाही आणि काव्यात त्याच्या लौकिकाच्या मानाने प्रसाद नाही. विष्णुदासनाम्याच्या भारताचेही अगदी असेच आहे. तेथे विपुल कथा आढळतात पण त्या नीरस व पुष्कळशा असमयोचित ! डॉ. सरोजिनी शेंडेच विष्णुदासनाम्याच्या भारताबद्दल म्हणतात, याचे अरण्यपर्व सुमार वठले आहे.[1] भीम-कीचक युद्ध ठराविक साच्याचे आहे,[2] स्वर्गारोहणपर्व सुमारच वठले आहे.[3] अशी अनेक उदाहरणे देता येतील ! हा सर्व परिणाम विष्णुदासनाम्याने आपल्या-समोर कथाकल्पतरू हा ग्रंथ ठेवल्यामुळे झालेला आहे !

तसेच, विष्णुदासनाम्याबद्दल माहिती देताना डॉ. सरोजिनी शेंडे सांगतात[4] की, भागवत महाभारताच्या आधी लिहिले गेले असावे अशी विष्णुदासनाम्याची चुकीची समजूत झाल्याचे दिसते. परंतु भाग असा असावा की, कृष्णयाज्ञवल्कीचा कथाकल्पतरू त्याच्या-समोर असल्यामुळे त्याला तसे वाटले असावे. कारण या ग्रंथात भागवत आधी वर्णिलेले असून उत्तरार्धातच महाभारत सांगितलेले आहे. त्यामुळे भागवत आधी झाले असून महाभारत नंतर झाले, अशी त्याची समजूत होणे सहज शक्य आहे. अशा प्रकारे या अनेक उदाहरणांवरून विष्णुदासनाम्याने आपले भारत सजविण्यासाठी कथाकल्पतरूचाही, भागवताबरोबर विपुल प्रमाणात उपयोग करून घेतलेला आहे, असे म्हणणे भाग पडते !

तेव्हा विष्णुदासनामा वर्णन करीत असलेले हे कथासूत्र, त्याचे स्वतःचे नसून ते त्याच्याही पूर्वी झालेल्या भारतरचनेत वर्णिलेले आहे, हे स्पष्ट होते. त्यामुळे साहजिकच या कथासूत्रास 'विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा एक महत्त्वपूर्ण वेगळेपणा' समजणे अयोग्य व चूक ठरते.

परंतु व्यासमहाभारतात न आढळणारे, अठरा ब्रह्महत्यांचे महापातक, जनमेजयास लागल्याचे हे कथासूत्र, मराठी महाभारत-कारांनी तरी कोठून घेतले असावे, याचा जेव्हा आपण शोध घेऊ लागतो तेव्हा त्याचे मूळ एकनाथी भागवताच्या एकादशस्कंधात आढळते. एकनाथमहाराज भारतमाहात्म्य सांगताना वर्णितात[5]—

> धर्म साह्यकारी श्रीकृष्ण।
> केले पांडवांचे रक्षण ॥
> त्या भारताचेनि श्रवणे जाण।
> निमाले ब्राह्मण वाचविले ॥ ३१२ ॥
>
> अठरा ब्रह्महत्त्या जनमेजयासी।
> अठरा पर्वे सांगोनि त्यासी ॥
> निमाल्या उठविले द्विजांसी।
> कृष्णकीर्ति ऐसी पावन ॥ ३१३ ॥
>
> अध्याय ३१ वा

विशेष नजरेत भरणारी गोष्ट अशी की, हा उल्लेख एकनाथ महाराज जरी आपल्या भागवती टीकेत करीत असले तरी मूळ संस्कृत भागवताच्या एकादशस्कंधात मात्र तो आढळत नाही! या नाथभागवतातून,

---

१ विष्णुदासनाम्याच्या भारताचा विवेचनात्मक अभ्यास. पान २४३

२ विष्णुदासनाम्याच्या भारताचा विवेचनात्मक अभ्यास : पान २४६

३ तत्रैव. पान २३४–२३५

४ तत्रैव. पान २३६

५ सार्थ श्री एकनाथी भागवत, संशोधित ३ री आवृत्ती (रा. कृ. कामतकृत) शके १८८० पान १२९६

कृष्णदास व मधुकर यांनी हा कथाभाग उचलला असावा व तोच, विष्णुदासनाम्याने आपल्या भारतात, कथाकल्पतरूतील समग्र कथा घेऊन, सर्व भारतभर गोवला असावा असे वाटते. या सर्व विवेचनावरून हे कथासूत्र, विष्णुदासनाम्याचे महत्त्वपूर्ण वेगळे वैशिष्ट्य होऊ शकत नाही हेच सिद्ध होते.

विष्णुदासनाम्याचे स्वर्गारोहणपर्व हे एकच पर्व असे आहे की, ज्याच्या प्रतीप्रतीत फार फरक दिसत नाही. तेव्हा स्वर्गारोहणपर्वाची, रचना करण्याची विष्णुदासनाम्याची जर आपण पद्धती पाहिली तर त्याने आपले महाभारत व्यासमहाभारताप्रमाणे न रचिता ते भागवत व कथाकल्पतरू यांच्या साहाय्याने रचलेले आहे, असे म्हणणे सयुक्तिक ठरते; व त्या दृष्टीने त्याचा तौलनिक अभ्यास व्हावयास हवा. या तौलनिक अभ्यासात, विष्णुदासनाम्याच्या महाभारतात येणारा जो भाग त्याने स्वतंत्र रचिला आहे असे आपणांस वाटते, तो स्वतंत्र नसून भागवताधिष्ठित आहे किंवा कथाकल्पतरूवर आधारित आहे, हे समजून येईल. अशाप्रकारे विष्णुदासनाम्याच्या स्वर्गारोहण पर्वाचा तौलनिक अभ्यास संपलेला आहे; आणि याच अभ्यासाबरोबर, 'विष्णुदासनाम्याचे महाभारत : एक अभ्यास,' ही प्रदीर्घ लेखमाला पण संपलेली आहे. महाराष्ट्र साहित्य पत्रिकेच्या संपादक मंडळाने या लेखमालेसाठी विस्तीर्ण जागा दिल्याबद्दल कृतज्ञता व्यक्त केल्याशिवाय राहवत नाही म्हणून ती व्यक्त करून ही लेखमाला संपवितो.

## संदर्भ ग्रंथ

महाभारत : (B. O. R. I. Edition) स्वर्गारोहणपर्व.

विष्णुदास नामा : महाभारत–हस्तलिखित पोथ्या. आदि, कर्ण, स्वर्गारोहण विष्णुदासनाम्याच्या महाभारताचा विवेचनात्मक अभ्यास : प्रा. सौ. सरोजिनी शेंडे.

(Unpublished Ph. D. Thesis in the University of Bombay).

कथाकल्पतरू : कृष्णयाज्ञवल्की.

बृहद्काव्यदोहन, भाग ८ मो; इच्छाराम सूर्यराम देशाई, मुंबई १९१३.

नामा पाठक : अश्वमेधपर्व.

संस्कृत साहित्याचा सोपपत्तिक इतिहास : डॉ. वि. वा. करंबेळकर.

भा. इ. सं. मं. अहवाल, शके १८३२.

नवे नवनीत; संपादक : श्री. ज. शा. देशपांडे.

प्राचीन चरित्रकोश : सिद्धेश्वरशास्त्री चित्राव.

श्रीमन्महाभारत उपसंहार (भाग १० वा), (द्वितीयावृत्ती १९२२)

भारतवर्षीय प्राचीन ऐतिहासिक कोश. कै. र. भा. गोडबोले.

An Index to the names in the Mahabharata ; by Sorensen. 1904

मराठी वाङ्मयाचा इतिहास खंड २ रा. ल. रा. पांगारकर.

महाराष्ट्र सारस्वत (चतुर्थावृत्ती) कै. वि. ल. भावे.

मराठी संशोधन पत्रिका : अंक २ रा जानेवारी १९६०; अंक ३ रा एप्रिल १९५९

सार्थ श्रीएकनाथी भागवत. संशोधित प्रत; ३ री आवृत्ती, शके १८८०, संपा. रा. कृ. कामत.



# मराठी कोरीव लेखांतील पद्यरचना

—कुमुदिनी घारपुरे

पद्यरचनेच्या दृष्टीने प्राचीन मराठी कोरीव लेखांकडे नजर टाकली तर शालिवाहन शकाच्या १० व्या शतकापासून १४ व्या शतकापर्यंतच्या पहिल्या टप्प्यांत पद्यरचना कोठेच दृग्गोचर होत नाही. क्वचितच कोठे लयबद्धता आढळली तरी ते गद्यच असते; आणि वेळापूरसारख्या अपवादात्मक शिलालेखात एखादीच ओळ वृत्तबद्ध आढळली तरी ती केवळ योगायोगानेच! उदाहरणार्थ, शके १२२७ मधील यादव रामचंद्रदेव याच्या वेळापूर शिलालेखातील[1] काही भाग :

"तो पैं कीर्तिविसालु कालु गिलिला सत्रें ध्वजें लागला" (ओळी १५, १६)

किंवा

"चौ[2]... घिं चालत भीतरी द्विजवरीं ओ...वालिला सुखरिं"(ओळी १६, १७, १८)

यातील 'घिं' दीर्घ करणे आणि 'सुखरिं' हा शब्द 'सुखरीं' असा वाचणे असे ऱ्हस्व-दीर्घांचे अगदी किरकोळ फेरफार केले तर वरील दोन्ही चरण शार्दूलविक्रीडितात बरोबर बसतात. मात्र या पद्य भागाच्या आगेमागे गद्यच आहे. तसेच याच लेखातील 'किं वर्णो महिमा गजागजधुरा' (ओळ १४) हा भाग 'किं' दीर्घ केली तर शार्दूलविक्रीडित चरणाच्या यतिपूर्व भागाप्रमाणे वाटतो; परंतु त्यानंतर येणारा भाग मात्र गद्य आहे. लेखान्तीचे संस्कृत शापवचनपर श्लोक सोडले तर एकंदर शिलालेख मराठी गद्यातच आहे.

—म्हणूनच जवळजवळ एकतीस ओळींच्या गद्य भागात शार्दूलविक्रीडित वृत्तात येणाऱ्या या दोन ओळी म्हणजे एक योगायोग म्हणावा लागतो.

मात्र या काळात मराठी भाषेत पद्यरचना अजिबात नव्हतीच असे नाही. कारण मराठीतील पहिले पहिले उपलब्ध शिलालेख श्रवणबेळगोळ (शके ९०५ किंवा शके १०३४) किंवा अक्षी (शके ९३४) हे पूर्णपणे गद्य असले तरी मराठीतील प्राचीनतम पद्यरचनेचा समावेश[3] व निर्देश ज्यांत आहे असा 'मानसोल्लास' अगर 'अभिलषितार्थचिंतामणि' हा सोमेश्वर रचित ग्रंथ शके १०५१ मधील म्हणजे ११ व्या शतकातीलच

---

१ ग. ह. खरे : द. म. इ. साधने खं. १, पृ. ८०–८१; १९३०

शं. गो. तुळपुळे : 'प्राचीन कोरीव मराठी लेख'. मराठी संशोधन पत्रिका, व ४, अं. ३, पृ. १ ते ५२ ; १९५७

मो. गं. दीक्षित : 'काही मराठी शिलालेख-नवे पाठ', मराठी संशोधन पत्रिका, व. ६, अं. ४, पृ. २१ ते २५; १९५९

२ या ठिकाणी मूळ शिलेला भोक पडले आहे म्हणून अक्षरे दूर आहेत. एरवी ती जोडून वाचावयाची.

३ "जेणे रसातलउणु मत्स्यरूपे वेद आणियले मनु शिवकवाणियले
तो संसारसाय (ग)र तारण(गु)मोहं तो रापो(खो) नारायणु ॥"

––मानसोल्लास, भाग २, अध्याय १६,

पद्य ३४० ; गायकवाड ओरिएण्टल सीरीज पृ. ३८ रागतालांची माहिती देताना सोमेश्वर वरील पद्य उद्धृत करतो.

आहे. 'मानसोल्लासा'त महाराष्ट्रातील गायका कांडताना ओव्या म्हणत असा निर्देश[1] असल्याने त्या काळात घराघरांतून पद्यरचनेतील ओवीछंद गाइला जात होता, अर्थात रचलाही जात होता असे म्हणण्यास हरकत नाही.

बारा-तेराव्या शतकात विवेकसिंधु (शके १११०) आणि ज्ञानेश्वरी (शके १२१२) या ग्रंथांनी मराठी वाङ्मयात केवळ पद्यरचनेची नव्हे तर काव्यरचनेचीही परंपरा सुरू केली. पण नवलाची गोष्ट अशी की वाङ्मयाच्या प्रांतात फोफावलेल्या या अपूर्व काव्यवृक्षाची पुसटशी सावलीही कोरीव लेखांवर पडलेली नाही. या बाराव्या तेराव्याच नव्हे तर चौदाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत जे कोरीव लेख पूर्ण मराठी आढळतात ते गद्यबद्ध आहेत; आणि जे लेख मराठी-संस्कृत संमिश्र भाषेत आहेत त्यांतही पद्यरचना केवळ संस्कृतातच आढळते. पुढे पुढे या संमिश्र लेखांतून मराठीचे प्रमाण वाढलेले दिसते. पण ते गद्यापुरते; आणि संस्कृतचे प्रमाण कमी झालेले दिसले तरी जे संस्कृत दिसते ते बहुशः पद्यबद्ध आहे. सर्वसाधारणपणे कोरीव लेखांतून लेखारंभीची मंगलवचने, कालनिर्देश राजांची बिरुदावली, लेखान्तीची आशीर्वचने वा शापवचने हा भाग संस्कृतात येई आणि मुख्य विषयाचा तपशील, 'दानाचा विवरु', शासनाचे वा कराराचे स्वरूप, साक्षी व कधी कधी ते शासन मोडणारास घालावयाची 'आण' आणि शापवचन किंवा गद्धेगाळ मराठीतून येई. लेखातील आशयाच्या अशा विभागणीमुळे पद्यरचनेला अनुकूल विषय संस्कृत भाषेस जसे लाभले तसे मराठीच्या वाट्यास आले नाहीत हे खरेच! पण वस्तुस्थिती एकच राहिली की मराठी कोरीव लेखांच्या पहिल्या टप्प्यात पद्यरचनेचा वाटा मराठीकडे न येता संस्कृतकडे गेला आणि तोही मराठी पद्यरचना अस्तित्वात असून! सारांश, मराठी भाषेचा पारिजात कोरीव लेखांच्या अंगणात लागला तरी त्याची फुले मात्र पडली ग्रांथिक वाङ्मयाच्या अंगणांत! त्या पद्यपुष्पांचा काव्यगंध यादवकाल, शिवपूर्वकाल, शिवकाल, पेशवाई या साऱ्या कालखंडास धुंद करून आजही दरवळत आहे; पण कित्येक वर्षे यागंधमय घटनेचा वासही कोरीव लेखास आला नाही.

मराठी लिखितवाङ्मयाचे प्रारंभस्थान होण्याचा मान कोरीव लेखांस मिळाला तरी तेथे पद्यरचना सर्रास सुरू होण्यास १५ वे शतक उजाडावे लागले. १४ व्या शतकानंतर जवळजवळ शंभरसव्वाशे वर्षांच्या काळात मुळात मराठी कोरीव लेखच इतका दुर्मिळ झाला की त्यातील पद्यरचना हाती लागणे अशक्यच व्हावे. या काळात मराठी कोरीव लेख लुप्तप्राय होण्याचे कारण कोरीव लेखांचे स्वरूप आणि महाराष्ट्राची राजकीय परिस्थिती यात असावे. कोरीव लेख हा सर्वसाधारणपणे जाहीरनामा, करार, बक्षिसपत्र, दानपत्र या धर्तीचा म्हणजे प्रामुख्याने सार्वजनिक स्वरूपाचा असतो; तसेच तो दीर्घकाल लोकांच्या स्मरणात राहावा या अपेक्षेने कोरलेला असतो. साहजिकच तो लोकभाषेत असणे जेवढे आवश्यक असते तेवढेच त्यास राजसत्तेची मान्यता असणेही आवश्यक ठरते. लोकभाषा आणि राजभाषा एकच असेल तर कोरीव लेखांचे उद्दिष्ट सुलभ होते; पण

---

१. 'महाराष्ट्रेषु(षु) योषिद्भिरुवी(रोवी) गेया नु(तु)कण्डने।
होलाके चच्चरी गेया राहडी वीरवर्णने ॥ १९७ ॥

तसेच श्लोक ५५३ यातही निर्देश मानसोल्लासातील 'गीतविनोद' प्रकरणात चालुक्य वंशातील राजा सोमेश्वर दोनदा उपर्युक्त निर्देश करतो.

परकीयांच्या आणि परभाषिकांच्या वर्चस्वाखाली, चिरस्मरणार्थ कोरले जाणारे लेख त्यांचे उद्दिष्ट साध्य होत नसल्याने, लुप्तप्राय होणे किंवा मुळात अजिबात कोरले न जाणे अधिक शक्य असते. त्यांतूनही परकीय आक्रमणाचा काळ चालू असेल तर अशा स्वरूपाची कृत्ये होण्यास वाव व वेळ नसतो. म्हणूनच की काय महाराष्ट्रात मुसलमानी आक्रमण सुरू झाल्यानंतर काही विशिष्ट काळात कोरीव लेख आढळत नाहीत.

मराठी कोरीव लेख पुन्हा एकदा प्रामुख्याने दिसू लागतात ते शिवपूर्वकालापासून, आणि त्यांतील पद्यरचनाही विशेषत्वाने व विपुलत्वाने नजरेत भरते ती मराठेशाहीतच!

शार्दूलविक्रीडित, वसंततिलका, इंद्रवज्रा, भुजंगप्रयात, स्रग्धरा, स्वागता यांसारखी संस्कृतात प्रचलित असलेली वृत्ते मराठी पद्यलेखांत पुष्कळच आहेत. तरीदेखील ओवी, पोवाडा यासारखे छंद-प्रकार योजून मराठीने कोरीव लेखांतही आपले पद्यरचनेचे वैशिष्ट्य कायम राखले आहे. कोरीव लेखांच्या भूमीवर वृत्त आणि छंद सारख्याच कुशलतेने नृत्य करीत असता पद्याचा भास उत्पन्न व्हावा अशी डौलदार तालबद्ध पावले टाकीत मराठीची लयबद्धताही तेथे प्रवेश करते. मराठी कोरीव लेखांतील पद्यरचनेचा आविष्कार वृत्त, छंद आणि लयबद्धता अशा तीन प्रकारांनी होतो. परंतु या पद्यरचनेचे लेखन मूळ कोरीव लेखात चरणानुसारी असतेच असे नाही, किंबहुना नसतेच. बहुधा ते गद्याप्रमाणे सलग आणि अनेकदा तर वाटेल तसे शब्द तोडलेले असते. खालील वर्गीकरणात मात्र पद्यरचना चरणानुसारी पद्धतीने दिलेली आहे. ऱ्हस्वदीर्घाचे दोष मात्र तसेच ठेवले आहेत.

## वृत्तप्रकार

### (१) शार्दूलविक्रीडित

(i) शके १६१८ मधील खेड-शिवापुरचा शिलालेख. या शिळा नदीजवळच्या दर्ग्याच्या पाठश्याशी आहेत.[१]

शाके रंध्रनगारसेंदु गणना वामक्रमे लेखणे ॥
धाता वत्सर दु(उ)र्जे पंचमी बुध ॥ ६ण शुभ सद्दिने
गोपाळ(ळा)त्मज सीवराम सुचिते शंभु प्रतिक्षा करि ॥
जालि सुस्थिर श्री तया महि तदा दे शंभु त्याते करादि ॥ १ ॥

कर्यात्सास्वड देशलेखनक्रिया हे जीर्ण वृत्ति वसे ॥
ऋग्वेदोत्तम अत्र गोत्र जनिता आराध्य शंभु असे ॥
देवागारसुवृक्षपुष्पवाटिका निर्मि अकामे धने ॥
त्याते इछित दे शिव प्रतिपदि सद्भक्ति प्रासाधने ॥ २ ॥

(ii) शके १६६१ मधील निंबगावचा खंडोबाच्या देवळातील द्वारलेख.[२]

श्रीगणेशायनमः ॥
सोळाशे वरि येकसष्टि वरषे सिद्धार्थि संवत्सरी ॥
शाळीवीन शकी सुबुद्धि उपजे त्यामाजि गंगाधरी ॥
द्रव्याची ममता तिही न धरिता अर्पूनि या शीखरी ॥
जाडुनि कर आणि शीर कमळे भावार्थ या ईश्वरी ॥ १ ॥

---

१ गो. का. चांदोरकर : ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड ४, पृ. ११७-११८

२ गं. ना. मुजुमदार : भा. इ. सं. मंडळ, शके १८३५ चे इतिवृत्त, पृ. ४६२

(iii) शके १६८२ मधील पारनेरचा नारोबाबजीचा देवालय लेख[१].

श्री गजानन ॥ श्री विठलचरणि तत्पर नारो बाबजी अभ्यंकर नीरंतर [।]

स्वस्ति श्री नृप शालिवाहन शके
सोला शते ब्यायसी :
नामे विक्रम वत्सरी तदुपरी
माघाचिये द्वादशी :
शुध पक्ष बरा जगी सुख करी
चंद्राचिये वासरी :
श्री मद्वीठल शीखराशी रचीले
सत्क्षेत्र पाराशरी ॥

बौद्धावतारे शुभ :

(iv) शके १६५२ मधील दौलताबादचा मानपुरी मठांतील समाधि लेख[२].

(v) शके १६६१ मधील निंबगावच्या खंडोबा देवालयातील दक्षिण बाजूचा लेख[३]. हा खंडित पण वृत्तबद्ध आहे.

(vi) शके १६७८ मधील बहिरगावचा समाधिलेख[४].

(vii) शके १७८७ मधील मानपुरीचा दुसरा समाधि लेख.[५]

(viii) शके १६५९ मधील अर्नाळा जंजिऱ्याचा द्वारलेख. या लेखात दोन कडवी असून पहिले कडवे शार्दूलविक्रीडित वृत्तात आहे.

२ स्वागता

(i) शके १६५९ मधील अर्नाळ्याच्या [वर (viii) मध्ये दिलेल्या] द्वारलेखातील दुसरे कडवे.

अंक ९ बाण ५ रस ६ चंद्र १ शकाते
ज्येष्ठ पिंगळ सितेन्दु दिनाते ॥
रोहिणी ध्रुव सुपुष्यहि जेव्हा ।
यशवंत बुरुजा करि तेव्हा ॥

येथे पहिल्या चरणातील आकडे केवळ संकेत-संख्या दर्शवतात. वृत्ताच्या अक्षरसंख्येत ते धरावयाचे नाहीत. चौथा चरण वृत्तदृष्ट्या सदोष आहे.

३ स्रग्धरा

(i) शके १६३४ ते १६५० (तंजावर येथील शरफोजीची कारकीर्द) मधील जेजुरीचा (खंडोबाचे पितळी मूर्तीवर व प्रभावळीवर कोरलेला) मूर्तिलेख[६].

(i) मालोजी भोसल्याचे उदरजलनिधी
शाहशीतांशु झाला
तद्गर्भि येक राजा तनयवर तीचे
त्यास दिपांबिकेला
शाहक्ष्मापः शरीफाऽवनिप सुगुण तुक्कोजि
भूपार्कवंशी
खंडराया स्वदैवा शरभनृपवरे अर्पिले जेजुरीशी

---

१ चिं. ल. नगरकर : 'पराग', जून १९४८, पृ. ४९

२ गो. का. चांदोरकर : भा. इ. सं. मंडळाचे वार्षिक इतिवृत्त, शके १८३४, पृ. २१०

३ गं. ना. मुजुमदार : भा. इ.सं. मंडळाचे शके १८३५ चे इतिवृत्त, पृ. ४६२

४ वा. वि. जोशी : ऐतिहासिक संकीर्ण निबंध, भा. १, पृ. ६

५ गो. का. चांदोरकर : भा. इ. सं. मं. चे वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, पृ. २११

६ स. म. दिवेकर व पां. न. पटवर्धन : भा. इ. सं. मं. चे वार्षिक इतिवृत्त, शके १८३८, पृ. १२९

७ द. वा. पोतदार : भा. इ. सं. मं. चे वार्षिक इतिवृत्त, शके १८३५ पृ. २६९

### ४ इंद्रवज्रा

(i) शके १६६२ मधील पैठण येथील कृष्णदयार्णवांचा समाधि लेख[1].

रौद्री द्विषट् षट् शशि चाब्द वर्षी
सत्पंचमी शुक्ल सुमार्गशीर्षी
नैर्गुण्य श्रीकृष्ण दयार्णवासी
तत्पादुका पूज्य सुखैकराशी

(ii) शके १६९० मधील वणी येथील सप्तशृंगीचे देवालयास असलेल्या पायऱ्यांवरील लेख[2]. यांतील दोन्ही कडवीं इंद्रवज्रा वृत्तात आहेत.

(iii) कायगाव येथील गोदावरीनदीच्या घाटावरील वृंदावन लेख[3]. याचा काल अनिर्णित आहे.

॥ श्री ॥
अनंत संगे सारजा निघाली
धन्य धन्ये हे जगी ख्यात केली.

### ५ वसंततिलका

(i) शके १७११ मधील अमडापूर येथील म्हाळसेश्वरदेवालयातील द्वारलेख[4].

श्रीम्हालसेश्वर महेश्वर देवराजा
भक्ताभयप्रद असा नसे देव दुजा
तत्पादपद्मयुगुळी स्थिर चित्त वृत्ती
ज्या परशुराम इटकार असी वद(दं)ती
शके १७११ सौम्य नाम संवत्सरे.

(ii) शके १६६० मधील पंढरपूर येथील विठ्ठलमंदिराच्या गरुडमंडपाजवळच्या दोन ओवऱ्यांवर असलेला लेख[5].

सोळा शतांवरि अधीकहि साठि पद्य ॥
त्या काळयुक्त वरषांत ही मास दाद्य ॥

कडव्याचा हा प्रथमार्ध वसंततिलका वृत्तात आहे. आणि खाली दिलेला द्वितीयार्ध इंद्रवज्रा वृत्तात आहे.

जाले तधी त्र्यंबकराव पेठे ॥
दो वोवऱ्या करि संतपेठे ॥

### ६ भुजंगप्रयात

(i) शके १६७२ मधील धावडशी येथील भुलेश्वरदेवालयाच्या गणेशपट्टीवर असलेला लेख[6].

या लेखात चार कडवी असून पहिले कडवे इंद्रवज्रा वृत्तात आहे. दुसऱ्या कडव्यातील चरण १ व ४ वसंततिलका आणि चरण २ व ३ इंद्रवज्रा या वृत्तात आहेत. तिसऱ्या कडव्याचा प्रथमार्ध–चरण १ व २–इंद्रवज्रा वृत्तात आणि द्वितीयार्ध–चरण ३ व ४ वसंततिलका वृत्तात आहेत.

चौथे कडवे भुजंगप्रयात वृत्तात आहे. (फक्त दुसऱ्या चरणांतील 'ळ' व 'नि' गुरु हवी होती)

तयाचा जगन्नाथ भक्त प्रशील ॥
समाधिस्थळ बांधिले हे सुनिल ॥
महाबुद्धिने योजिला जो सुशिल्पी ॥
तया शंकरें बांधिलें आत्मकल्पी ॥ ४ ॥
शके १६७२ प्रमोदनाम संवत्सरे

---

१ शं. श्री. देव : भा. इ. सं. मं. चे वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, पृ. २४८ संपादक शं. ना. जोशी : 'हरिवरदा' खंड १ प्रस्तावना.

२ शं. ना. जोशी – वाईकर : भा. इ. सं. मं. त्रैमासिक, व. १०, अं. २. पृ. १०८

३ मो. गं. दीक्षित : 'मराठेशाहीतील शिलालेख', पृ. ९४

४ मो. गं. दीक्षित : 'मराठेशाहीतील शिलालेख', पृ. ७०

५ वि. का. राजवाडे : 'ग्रंथमाला', पृ. १४

६ द. ब. पारसनीस : 'ब्रह्मेंद्रस्वामींचे चरित्र', पृ. १२८–१२९

## छंदप्रकार

### १ हरिभागिनी छन्द

(i) शके १६९१ मधील वणी येथील सप्तशृंगीच्या पायरीवरील लेख.[1]

श्रीदेविचरणि दृढ भाव बंधु त्रयांचा ॥
कोनेरि रुद्र कृष्ण जन स्थानी वास त्याचा ॥
रायारावें कृष्णनामें शोभत सु[ ज ]शासि ॥
दिगांति-कीर्ती मार्ग सुगम केला जगती ॥

या छंदांत १५ अक्षरे असून त्याची रचना पद्मावर्तनी [ । प । प । प । — — — ] अशी असते.[2]

### २ ओवी छंद :

(i) शके १६४५ मधील तळेगाव दाभाडे येथील ( विहिरीवरचा ) वापीलेख.[3]

ह्या लेखात पाच ओव्या असून प्रत्येक ओवीत चार चरण आहेत. प्रत्येक चरणात अक्षरसंख्या खालीलप्रमाणे :—

१ ला चरण — साधारण ९ किंवा १० अक्षरे
२ रा ,, — ,, ८ ते १२ अक्षरे
३ रा ,, — ,, ८ ते १२ अक्षरे
४ था ,, — ,, ८ अक्षरे

पहिल्या चरणाहून अधिक अक्षरे चौथ्यात कधीच नाहीत.

या ओवीच्या पहिल्या तीन चरणांत अंती यमक आहे, अखेरच्या चरणात नाही.

महीपती,[4] श्रीधर,[5] एकनाथ हे अशा प्रदीर्घ ओव्यांचा वापर करीत.

त्याहून प्रस्तुत ओवी किंचित भिन्न आहे. ग्रांथिक ओवीत पुष्कळदा पहिले तीन चरण व चौथ्या चरणाचा अर्धा भाग यांचे यमक असते, पण येथे ते नाही. ओवी छंदात विलक्षण विविधता व विभिन्नता असल्याने रचनासूत्र शोधून त्याचे नियमन करणे बिकट होते. परंतु ओवीप्रकारातील विभिन्नता व अक्षरसंख्येची अनियमितता लक्षात घेतली तर प्रस्तुत ओवीप्रकाराचा 'ग्रांथिक ओवी' या सदरांत[6] समावेश करण्यास हरकत नाही असे वाटते. प्रस्तुत लेखातील ओवीचा नमुना :

वौंशि आहे सवाइ बाळ :
यासि रक्षु श्रीगोपाळ :
हा करिल प्रतिपाळ :
गुमट आणि वापीचा ॥ ५ ॥

(ii) शके १६५६ मधील डभोई येथील कोनाडालेख[7] एकंदर ५४ ओव्यांचा हा पद्यबद्ध लेख दमाजीराव गायकवाड ( द्वितीय ) याच्या राजवटीतील असून त्यात डभईचे वैभव व दमाजीरावाचा गौरव गुंफलेला आहे.

या ओवीप्रकारात पहिले तीन चरण साधारण १० ते १२ अक्षरांचे व सयमक आहेत. चौथा चरण साधारण ७ ते १०

---

१ शं. ना. जोशी—वाईकर : भा. इ. सं. मं. त्रैमासिक, व. १०, अं. २, पृ. १०९

२ डॉ. माधवराव पटवर्धन : 'छंदोरचना', अ. ७ छन्दश्छाया, ५१७; उदाहरण —

( i ) " ईश्वराची । दया किती ।
थांग तिचा । लागेना
न्यायी तरी । त्याची प्रीती ।
सिन्धू ऐव । ढी जाणा

३ राजवाडे : इतिहाससंग्रह, ऐतिहासिक स्फुट लेख, पृ. ८४.

४ महीपती : " ऐसी सत्पुत्रें सांगता कथा :
संतोष पावली मातापिता,
म्हणती असेल तेथे असो आता :
श्रीरामचंद्र रक्षिता त्यालागी ॥ "

५ श्रीधर : " चांगुणा म्हणे कर जोडून :
मी आपले मांस देत्ये करी भोजन
श्रियाळ म्हणे ' मानेल पूर्ण ':
माझे मांस देतो मी ॥ "

६ डॉ. ना. ग. जोशी : 'मराठी छंदोरचना', प्र. ५, पृ. १७३ - १७४

7. A. S. Gadre : Important Inscriptions from Baroda State (1943), Vol., 1., No XI. pp. 89-98.





अक्षरांचा आणि पहिल्या तीन चरणांहून निश्चितपणे लहान असून त्याच्या अर्ध्या भागाच पहिल्या तीन चरणांशी नियमितपणे यमक साधलेले नाही. काही ओव्यात तसे यमक जुळवलेले दिसते तर काहींत दिसत नाही. या ओवीप्रकाराचाही समावेश 'ग्रांथिक ओवी'त करावयाचा. वरील वैशिष्ट्ये ज्यात आढळून येतात अशा काही ओव्या :

॥ श्रीगणेशाय नमः ॥
प्रथम नमो श्री गजवदना ॥
सिद्धिबुद्धिच्या तु रमणा ।
विद्या दातार सकळभुवना ।
विघ्ननाशना आदि[ मू ]र्ति॥ १ ॥
महाप्रतापि धुरंधर ।
जगप्रसिद्ध श्रेष्ट( ष्ठ )वीर ॥
कलियुगामाजि शमसेर ॥
कीर्ति जाली भुमंडळी ॥ ६ ॥ [ । ]
ऐसे पुरातन नगर स्थापिले ॥
तेजपुर्ण जीर्ण जाले ॥
तयासि छावकें नुतन केले ॥
स्वामिप्रसादे करुनि ॥ ३६ ॥
संनिद( ध )असे जगज्जननि ॥
ते करिते दुर्गाते रक्षणी ॥
निशिदिन पालन भक्तजनि ॥
करिते स्वामिनि दिनाचि ॥ ४० ॥
श्रीकुबेर आणि सोमेश्वर ॥
त्रिलोक्यनाथा तु उदार ॥
गायकवाडवंशी भांडार ॥
परिपूर्ण आहे जि सर्वदा ॥ ४६ ॥

३ पोवाडा :

( i ) शके १५५५ मधील सोलापूर किल्ल्यातील विहिरीवरचा शिलालेख.[1]

एकूण बारा ओळींच्या या शिलालेखात प्रास्ताविक कालनिर्देशाच्या तीन ओळी नवळ्या गद्यात आहेत. तिसऱ्या ओळीतील शेवटच्या दोन शब्दांपासून लेखान्तीच्या दोन शब्दांच्या बाराव्या ओळीपर्यंत या लेखाची रचना पद्यबद्ध आहे. या पद्याची लय 'पोवाडा' या छंदप्रकाराप्रमाणे वाटते. 'ना' या अक्षराच्या यमकाने या लयबद्ध चरणाची अखेर होते. बारा ओळींच्या मूळ शिलालेखात पोवाड्याचे १३ चरण आढळून येतात. त्यातील पहिले काही चरण नमुन्यादाखल पुढे दिले आहेत :—

"राजा शाहा सुलतान माहामद आदिलशहा पादशाहानाः
त्यावरि पुर्ण कृपा असे सुछाना :
कोट संदळापुर अपरुब नगिना :
बाळा किलामधे बुनियाद सोधुन केलि रचना :
माहामदखान पिरमाहामद जाचितखान हवालदार सुज्याणा :
नजिक शाहाबुरुज व दारुखानाः
तेथे नचि माहामदभाई बांधिली वापि चौकोनाः

**लयबद्धता**

( i ) शके १६९५ मधील खेड, तालुका खेड, येथील सिद्धेश्वरासमोरील दीपमाळेवरील लेख.[2]

श्री सिद्धेश्वर । चरणि रत ।
रघोजि चवान । दिपमाल विरचित ।
शके १६९५ । विलंब नाम संवत्सर ।
कार्तिक मास सुध । ५ स बुधवासर ।
मूळनक्षत्र प्रा । रभ सिद्धेश्वर ।

( ii ) शके १६६० मधील पंढरपूर येथील सोळखांबी जवळच्या ओवरीवरील लेख.[3]

या लेखातील पहिल्या दोन ओळी पद्यसदृश तालबद्ध आहेत.

श्री विठ्ठल चरणि । दृढ भाव ।
—। पांडुरंग निळो । सिवदेव ।

१ वि. म. कुळकर्णी : दयानंद कॉलेजचे नियतकालिक, (१९५७–१९५८), पृ. ४२-४३,

२ वि. का. राजवाडे : भा. इ. सं. मं. शके १८३२ चा अहवाल पृ. ४०

३ वि. का. राजवाडे : 'ग्रंथमाला' पृ. १३

(iii) शके १६५९ मधील लुधियाणा (सौराष्ट्र) येथील शंकराचे देवालयातील लेख[१].

श्री शिव । चरण । तत्पर ।
दामाजी । गायक । वाड नी । रंतर ॥

(iv) शके १६९४ मधील पाली (खंडोबाची) येथील मारुति देवालयाच्या ओवरीतील स्तंभलेख.[२]

(v) शके १६९७ मधील जेजुरी येथील गाभाऱ्यातील मखरावर असलेल्या चांदीच्या कवचावरील लेख[३].

लोकोपयोगी धार्मिक कृत्ये किंवा वैयक्तिक स्मारके अशा रूपात मागे नाव राहावे या उद्देशाने वरील प्रकारचे अनेक लेख मराठेशाहीत कोरले गेले. अशा लेखांतून यमक, अनुप्रास यांच्या साहाय्याने लयबद्धता साधण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. 'तत्पर', 'निरंतर' या मायनेवजा शब्दांचे परस्परांशी व व्यक्तिनामांशी आणि कालनिर्देशाशी यमक जुळवण्याचा, 'दास', 'निवास' यासारख्या अनुप्रासातून नाद निर्मिण्याचा, ताल उत्पन्न व्हावा म्हणून दैवतवाचक व व्यक्तिवाचक नामांच्या अक्षरसंख्येचा एकमेकांशी मेळ घालण्याचा असे पद्यपोषक प्रयत्न या लेखातून दिसून येतात. कित्येकदा अशा लेखांतून लयबद्धता इतक्या सफाईने व सुंदरतेने साधलेली असते की तेथे छंदोबद्ध पद्यरचना आहे असा भास व्हावा.

परंपरेने चालत आल्यामुळे रूढी म्हणून वृत्तांचा आणि सुलभीकरणाकडे असलेल्या सहज प्रवृत्तीमुळे वैशिष्ट्य म्हणून छंदाचा अशा दोन पद्यप्रकारांचा वापर मराठीने कोरीव लेखांतून केला. कोरीव लेखांतून येणाऱ्या आशयास ते साजेसेच होते. पद्यसदृश लयबद्धतेनेही आशयाच्या स्वरूपामुळे मराठी कोरीव लेखांत आपले स्थान सुलभता, नादमयता व सुंदरता या तीन गुणांवर टिकवून धरले. मात्र कोरीव लेखांतील आशयाचे स्वरूप काव्यास आणि गेयतेस अनुकूल नसल्यामुळे की काय मराठी वाङ्मयाच्या अर्वाचीन कालखंडात वैपुल्याने आढळणाऱ्या गेय जातिप्रकाराचा मराठी कोरीव लेखात पूर्णपणे अभाव आहे.

सारांश, (i) मराठी कोरीव लेखांतील पद्यरचना प्रामुख्याने वृत्तबद्ध असून त्यावर संस्कृत वृत्तांचा प्रभाव स्पष्टपणे आढळतो. वृत्तरचना मात्र विशेषनामे योजताना सोयीखातर ऱ्हस्वदीर्घांची ओढाताण करणारी, काहीशी शिथिल व सदोष आहे.

(ii) ओवी, पोवाडा यासारखे अस्सल मराठी छंदप्रकार योजून पद्यबद्ध कोरीव लेखांत मराठीने आपले वेगळेपण व वैशिष्ट्य कायम राखले आहे.

(iii) यमक, अक्षरांची तालबद्ध जुळणी, अनुप्रास यांच्या आधारावर गद्यातही पद्यसदृश लयबद्धता साधण्याचा प्रयत्न मराठी कोरीव लेखांत दिसून येतो.

(iv) मराठी कोरीव लेखांत जाती किंवा मात्रावृत्तांचा आढळ अजिबात होत नाही.

(v) शालिवाहन शकाच्या १० व्या शतकापासून १४ व्या शतकापर्यंतच्या मराठी कोरीव लेखांच्या पहिल्या टप्प्यांत पद्यरचनेचा एकमेव अपवाद आढळतो तो योगायोगाने.

(vi) मराठी कोरीव लेखांतील पद्यरचनेस बहर येतो तो लोकभाषा व राजभाषा एक असताना म्हणजे मराठेशाहीतच!

अक्षर राहावी म्हणून कोरलेली ही पद्यबद्ध अक्षरे आजवर उन्हापावसातून, भूकंपभंजनातून कालाच्या प्रवाहात तग धरून राहिली खरी; परंतु प्रत्यक्षात त्यांची वाताहात

१ द. बा. डिसकळकर : भा. इ. सं. मं. त्रैमासिक, व. २, पृ. ७६
२ ग. ह. खरे : 'महाराष्ट्रातील चार दैवते' पृ. ११२
३ द. वा. पोतदार : भा. इ. सं. मं. वार्षिक इतिवृत्त, शके १८३५, पृ. २६६–२७१

पाहिली, मोठ्या यातायातीने व कष्टाने संशोधकांना ज्या परिस्थितीत ती हस्तगत करावी लागली तिची जाणीव झाली की मन विषण्ण होते. " I am Ozymondyos), the King of Kings " असे दर्पाने म्हणणाऱ्या ऑझिमॉंडियासची आणि कालांतराने इजिप्तच्या अफाट वाळवंटात इतस्ततः विखुरलेल्या त्याच्या अवाढव्य पुतळ्याच्या करुण अवशेषांची आठवण झाली की या अक्षर अक्षरांची क्षणभंगुरता तीव्रतेने जाणवते आणि " कालाय तस्मै नमः। " म्हणून मान लववण्याखेरीज गत्यंतर उरत नाही.

---

# बुधबावणी

—ज. शा. देशपांडे

तुकारामाच्या पूर्वीही मराठी भाषेत व्यावहारिक उपदेशपर काव्य होत असे. 'बुधबावणी' हे काव्य अशांपैकी एक आहे. बुधबावणीचा विशेष म्हणजे तीत ओवींच्या प्रथमाक्षरांवरून अ पासून ज्ञ पर्यंत अंकलिपी तयार होते. छापील बुधबावणीत (नवे नवनीत पृ. १२२–१२५) तिचा कर्ता विष्णुदासनामा असल्याचे शेवटी लिहिल्याचे आढळते व दुसऱ्या प्रसंगात विसाव्या ओवीत खुद्द नामदेवांचाच उल्लेख येतो. तपास करताना आणखी (१) विष्णुदासनामाकृत बुधबावणी ओव्या ८१ (२) विष्णुदासनामाकृत बुधबावणी ओव्या ६० (हिच्या शेवटी 'नामदेव वीरचीत' असे लिहिले आहे) (३) नामदेव विरचित बुधबावनि, पहिला प्रसंग ओव्या २१ व (४) महालिंगदासकृत बुद्धिबावनी, ओव्या ६१, अशी चार काव्ये पाहण्यास मिळाली. ही सर्व काव्ये फार सारखी आहेत. परंतु या चारी काव्यांत नामदेवांचा उल्लेख आढळत नाही. तिसरे काव्य अपूर्ण आहे हे मात्र लक्षात ठेवले पाहिजे. नामदेव व विष्णुदासनामा यासंबंधीच्या घोटाळ्यात येथे एकनाथकालीन महालिंगदासाची भर पडली आहे. तंजावर येथील सरस्वतीमहाल ग्रंथालयात अनेक अनामिक कवींची संकीर्ण काव्ये वाचताना या बुधबावणीची आठवण होते. ही काव्ये एकनाथकालीन असावीत. पहिली तीन काव्ये धुळे येथील श्रीसमर्थवाग्देवता मंदिरात असून चवथे काव्य तंजावर येथे क्रमांक १९५९ या हस्तलिखितात मिळते. या काव्याचा खरा कर्ता कोण हा प्रश्नच आहे.

पहिल्या बुधबावणीत 'नामदेवांचा' उल्लेख येतो. तिच्यात मूर्खलक्षणेही आहेत. रामदासांच्यापूर्वी ही लक्षणे सांगणारा हा प्रथम कवी दिसतो. तिच्यात श्रीकृष्ण, दुर्योधन इत्यादिकांचा उल्लेख असल्याने विष्णुदासनाम्याच्या महाभारतात ती आढळते की काय हे पाहणे जरूर वाटते. तंजावर येथे महालिंगदासाच्या नावाने आढळलेली 'बुद्धिबावनी' खाली देतो.

श्री

बुद्धिबावनी

श्रीगणेशाय नमः॥ ॐ वोविये शंभु गाईजे। वोखटे मनि न धरिजे। वोळखी पडो नेदीजे। तस्करासि ॥ १ ॥ नमन कीजे गोविंदा।

न लागीजे झळकवादा। न कीजे निंदा। साधुजनाची ॥ २ ॥ मानसि दृढ होईजे। महाविघ्न चुकविजे। मति तर्कु घेईजे। पुढिलांचा ॥ ३ ॥ शिव शिव ऐसे म्हणीजे। शिवनाम सदा ध्याईजे। सीकविले ऐकीजे। वाडिलाचे ॥ ४ ॥ धर्ममति धरावि। धनवृत्ति वाढवावि। धुमाळी न घालावि। राणिवसा॥५॥ अवगुण सांडिजे। अपशब्द न बोलिजे। अवकळा येऊ नेदीजे। आंगावरी ॥ ६ ॥ आदाय पाहुन वेच कीजे। आळा अवस्वरु चुकवीजे। आशाभंग होउ नेदीजे। भलतयाचा ॥ ७ ॥ ईश्वरी पूर्ण भजीजे। ईछा वोखटि सांडिजे। ईछा दान देईजे। याचकांसी ॥ ८ ॥ ऐसे वर्तिजे सुबुद्धि। ईश्वरू देता होये रीधी सीधी। ईष्ट सोयरा जोडिजे बुधी। जगामाजि ॥ ९ ॥ उशिरा न चालिजे मार्गु। उणीयासी न किजे संगु। उपशांति किजे रागु स्त्री-बाळकांवरी ॥ १० ॥ उपकारू भलतयासी कीजे। उधार मैत्रांसी नेदिजे। विरोध न कीजे। समर्थासी ॥ ११ ॥ रुषिवाक्य जाणिजे। रुषि मिळत्वेची बोळिजे। रीत्या हाति न भेटिजे। गुरुस्वामिया॥ १२ ॥ रीधी सीधी वोळगीजे। रीणाचा कंटाळा मानिजे। रीण पांगुन कीजे। निर्धानाचा ॥ १३ ॥ ळीनपण न धरिजे। ळींगासि अर्चन कीजे। ळीळा वीनोदे वर्तिजे। जगामाजी ॥ १४ ॥ ळीहु चांगळे जाणिजे। ळीखीत भलतैसे वाजिजे। ळिपि वोळखीजे। भलतैसी॥ १५॥ येकळीया परदेशा न जाईजे। येराचे येरा न लाविजे। येकाचिते वोळगीजे। परमेश्वरू ॥ १६ ॥ ऐसा वोळगता देव अपरांपरू। ऐसी कृपा येईल त्यासि थोरू। ऐसा तारील निरंतरु। भवसागरी ॥ १७ ॥ वोळग समर्थासी कीजे। वोसात येकले न जाईजे। वोचढियाने न किजे। कुळवाडि ॥ १८ ॥ अवघा तजीजे मदमछरु। अवघा तजीजे डंब अहंकारू। अहो जाणीजे ईश्वरू। ईये संसारी ॥ १९ ॥ अंतःकराणि दृढ होईजे। अनंताचे स्मरण कीजे। अन्नदान दीजे। वितासारिखे ॥ २० ॥ अंग माते (?) गमीजे। स्त्रीयेसि गुज न जाईजे। आपपरू वोळखीजे। काळवेळे ॥ २१ ॥ कळीजवळी उभे न राहिजे। सार खोळ विद्या अभ्यासिजे। काजेविण न जाईजे। राजद्वारा ॥ २२ ॥ खळदुर्जनाचा संग न कीजे। गेळीयाची खंति न धरिजे। खणीक तो वर्जीजे। आंगापासुनी ॥ २३ ॥ गंभीरपणे असीजे। गर्वपण न कीजे। गति मति भेदु जाणिजे। पुढीळांचा ॥ २४ ॥ घनवट होईजे। घरी प्रौढी न बोलिजे। धडीभरी न राहिजे। सुखसंगेविण ॥ २५ ॥ नाम हरीचें उचारीजे। नास कुळासी होऊ नेदीजे। नाथीळेपण न बोलिजे। भलतेथे ॥ २६ ॥ चाळे भळतेची चाळविजे। चाळे ते चाळविजे। चमत्कार विद्या अभ्यासीजे। भळत्यापासि ॥ २७ ॥... क्षेत्रभंगु न किजे। जगामाजी ॥ २८ ॥ जगंनाथ आराधिजे। जन्म वायां जावों नेदिजे। उपकारु कीजे। भलतयासी ॥ २९ ॥ सुखवादा न लागीजे। झणि पीसें न खवळीजे। झडकरी निघिजे। स्वामिशब्दें ॥ ३० ॥ सुपात्रिं भजीजे। दासी संगु न कीजे। यापरी असीजे। जनामाजी ॥ ३१ ॥ टकटक वायां न लाविजे। टवच कोण्हासि न लाविजे। ठसपण न बोलिजे। भलत्यासी ॥ ३२ ॥ ठसा मोडो नेदिजे। ठेवा जतन ठाईं ठेविजे। ठक्र वर्जीजे। व्यवसीयांसी ॥ ३३ ॥ डंब लटिकाच न धरिजे। डळमळिळीयांसी धीरु देईजे। ढळढळीया न राहिजे। राजीकामाजी ॥ ३४ ॥ ढळ भाकेसी न कीजे। ढळळीयां मंदिरीं न राहिजे। ढळळी कीर्ती उभवीजे। भळतेणें ॥ ३५ ॥ नाना विद्या अभ्यासिजें। नानापरीं द्रव्यें जोडिजे। नाव करीजे। ये मृत्यळोकी ॥ ३६ ॥ तरिजे दान पुण्यें। तरीजे तीर्थें तपे वने। तरण होये ज्ञाने। ईये संसार समुद्री ॥ ३७ ॥ स्थानभ्रष्ट न होईजे। थोताविळीयां बुधि न लागिजे। थारा कदापि न दीजे। तस्करासी ॥ ३८ ॥ दर्शन करीजे संतांचें। दास्यत्व करिजे स्वामीचें। दमन तरि कोणाचें। नसावें जाण ॥ ३९ ॥ धन संपति आराधिजे। धनसंग्रहा कीजे। धडगाव पाहिजे। वास्तिळागी ॥ ४० ॥ नमस्कार करावा

श्रीगुरुसी । जेणे मेळाविले ब्रह्मविदेसी । नावे जाळीया देहेसी । लोकत्रयामाजी ॥ ४१ ॥ पवित्र तेचि संग्रहीजे । परस्त्रीया अभीळाषा न कीजे । यात्रासाधन जोडिजे । या संसारी ॥ ४२ ॥ पणपणा सांडिजे । पण स्वामीसी न कीजे । फळ विद्येतें पाविजे । ज्ञानेकरुनि ॥ ४३ ॥ चरळाई न कीजे । बहुतामध्ये असीजे । बडबड न लाविजे । भळतयासी ॥ ४४ ॥ भजावे आदिपुरुशासी । भवबंधने तुटति वेगेसी । भलेपण जोडिजे सायासी । ळोकामाजी ॥ ४५ ॥ मान वडिळासी देईजे । माता पीत्याचे वचन पाळीजे । माव न चोळीजे । गुरुस्वामियांसी ॥ ४६ ॥ येतां जातां अवघे सरे । धर्माचें कार्य न सरे । यैसी कीर्ति उरे । अैसे कीजे ॥ ४७ ॥ रळी चाटि न कीजे । नूत्य वृति बोळीजे । राणि धीरु देईजे । संगतीयासी ॥ ४८ ॥ ळळा बाळकासी नेदिजे । ळटकी साक्ष न बोळीजे । ळवकरी नीघीजे । अवघड ठायाहुनि ॥ ४९ ॥ वाठ परम लाविजे । वाफ घाते पेरीजे । वाट न चालिजे । उसीरा मार्गु ॥ ५० ॥ सम विषम जाणीजे । शेरणागतासी रक्षीजे । संता महंता कीजे । साष्टांग नमस्कारु ॥ ५१ ॥ खरे खोटे जाणीजे । खरोयासी व्यापारु कीजे । खडतर न बोळीजे । जगी सोईरा ॥ ५२ ॥ शांतचि शब्द बोलिजे । शांतवृति वादिजे । सांचाळ करिजे । कुटुंबाचा ॥ ५३ ॥ हरीहराते भजीजे । हात परउपकारी ळाविजे । हारी येउ नेदीजे । आंगावरी ॥ ५४ ॥ अंतःकरणी सुद्ध राहिजे । अति राति भरु सांडिजे । अखंड आठवण कीजे । हरीनामाचे ॥ ५५ ॥ ळ पूर्णचेचि न बोळखीजे । ळोकामाजी गहनपणे राहिजे । लक्षी निज लक्ष बोळखीजे । श्रीकृष्णनाथु ॥ ५६ ॥ क्षेत्रे धर्म साच कीजे । क्षेत्र तार्थि राहिजे । क्षमा अंगीकारीली पाहिजे । प्रेमपदाते ॥ ५७ ॥ त्राहे त्राहे परमेश्वरा म्हणिजे । त्रासु गोत्रासि नेदिजे । तर्पण करीत जाईजे । परमेश्वरा ॥ ५८ ॥ काळ कर्मु जाणिजे । कर्कश कोण्हासी न कीजे । धर्मगति चालिजे । वडिळांचिया ॥ ५९ ॥ ज्ञानहीन न होईजे । ज्ञानपद पाविजे । ज्ञानेकडुनि वोळखीजे । परमेश्वरु ॥ ६० ॥ ऐसी हे बुद्धिबावनि । जो परिसता होय प्रतिदिनि । त्यासी बुद्धि उपजे मानि । म्हणे महालिंगदासु ॥

**श्रीशंकरार्पणमस्तु ।**

---

# अर्वाच्य : द्विमुखी शब्द

—दा. ल. अडोणी

'म. सा. प.'च्या मागच्या दोन (१४१ व १४२) अंकांत 'द्विमुखी' शब्दाबद्दल विवेचन व चर्चा ही प्रसिद्ध झाली. 'मराठीतील जोडशब्दां'चे विवरण करताना प्रा. (डॉ.) कोपरकर द्विमुखी (blends) बद्दल शेवटी म्हणतात--

'वाङ्मयात अशी उदाहरणे फारशी प्रतिष्ठा पावलेली आढळत नाहीत. असे काही द्विमुखी जोडशब्द मराठीत आहेत, पण ते मुद्दाम तयार केले आहेत.' अर्थाच्या दृष्टीने अप्रशस्त पण वाङ्मयात सुप्रतिष्ठित झालेला 'अर्वाच्य' शब्द विचारासाठी पुढे ठेवतो. यापूर्वी याचा कोणी जोड – द्विमुखी शब्द म्हणून निर्देश केल्याचे मला माहीत नाही.

'एकाचा आरंभ दुसऱ्याच्या शेवटास जोडून असे शब्द बनतात. त्यांचा जोड

होतो ते थोड्याफार भिन्न परंतु संबंधित अर्थाचे असावे,' असे डॉ. साहेब सांगतात. द्विमुखी शब्दाचे स्वरूप प्रा. कृ. पां. कुलकर्णी यांनी पुढीलप्रमाणे वर्णिले आहे.–"द्विमुखी शब्दांत एका शब्दाचा काही अंश व दुसऱ्या शब्दाचा काही अंश असे दोन्ही अंश असतात आणि त्याच्या अंशात दोन्ही मूळ शब्दांच्या अर्थातील छटा असतात. हे शब्द दोन तोंडे असल्यासारखेच आहेत." (शब्द, उद्गम व विकास, १४७)

या दृष्टीने 'अर्वाच्य' शब्दाचा मागोवा घेऊ. त्याचे व्युत्पादन दोन रीतींनी केलेले दिसते. (१·१) "अर्वाच्य–या शब्दाचा यौगिक अर्थ 'आधुनिक' 'आलीकडचा' असा आहे. याच विशेषणाचे दुसरे रूप 'अर्वाचीन' असे आहे."—चिप. 'माला' अंक ३८ : विष्णुपदी ३९७

—येथे मूळ रूप दिले नसले तरी 'अर्वाच्' हे विवक्षित आहे.

(१·२) अर्वाच्य ∠ अर्वाक् अवर + अच् गतौ – मोडक.

—रूपातील य प्रत्ययाचा उलगडा होत नाही आणि अर्थातील वाचिक अंश किंवा छटा यात आढळत नाही. अर्वाच् या सं. विशेषणाला य प्रत्यय लागून फिरून विशेषणच बनले असे समजावे लागते. तो तद्धित प्रत्यय विशेषणाला लागला तर आद्य वर्णाची वृद्धी होऊन भावार्थक (मधुर – माधुर्य) नाम बनते. नामाला लागणारा संबंधार्थक व कृदन्ताला लागणारा योग्यार्थक य प्रत्यय हे येथे अप्रस्तुत ठरतात. एवंच हे व्युत्पादन चिंत्य आहे.

(२·१) सं. अवाच्य 7 – मशको.

—या व्युत्पत्तीत र अव्युत्पन्न राहतो.

(२·२) सं अ + वाच्य ∠ वच् – 'र' आगम –व्युको.

—'र' आगमाचे उपपादन केलेले नाही.

(२·३) कै. आगाशे यांचे एतत्संबंधक 'ज्ञा. टीके.' तील विधान चिंत्य आहे.

"अर्वाच्य ह्या संस्कृत शब्दाचा अर्थ वर्णन करता येत नाही असा हा आहे. मराठीत मात्र ह्या शब्दाचा उपयोग चांगल्या अर्थाने करीत नाहीत." (ज्ञा. टीका. १४·८६ वरील पहा)

—मुदली 'अर्वाच्य' असा शब्द संस्कृतात नाही. त्यांनी दिलेला अर्थ भ्रामक आहे. प्रस्तुत शब्दाचे 'अवाच्य'शी साम्य असल्यामुळे समजुतीचा घोटाळा होऊन बहुधा त्यांनी वरील विधान केले असावे. (यात मुद्रणदोष असल्यास वरील प्रतिटीका अस्थानी होईल.) दुसऱ्याही वाक्यातील विधान लक्षणीय वाटते. संस्कृतमध्येच 'अवाच्य' शब्दात अर्थापकर्ष झाल्याचे दिसते. आपटे कोशात यौगिक अर्थ दिला आहे, पण शेवटी.

या शब्दांचे उपयोग प्राचीन मराठीत कोणत्या अर्थात आढळतात हे पाहू.

(१·क) मग दामुतें म्हणीतले : "हा भटो! आणीकीं आर्वाचीकां धुराचां ठांइं पाठवणीं दीधलेया अवसि न ये :... परि मी न वचोंचिः मग गोसांवीं सीक लाविली :

गो. प्रभुच. १०९, पृ. ३७

(१·ट) "अर्वाकाने फार बोलत्ये हाचि त्रास जाला!"

चयाचाई, पृ. ९० पद ७ ("मशको") १३४.

अर्वाक् – च् व अर्वाचीन हे सगोत्र शब्द आहेत. आर्वाचीक पदाचे वाच्यार्थ 'अलीकडील' (कालदृष्टया – कमी वयाचा) 'खालच्या बाजूचा' (– कमी प्रतीचा, योग्यतेचा) असे असून लक्षणेने कच्चा, अननुभवी असा अर्थ निघतो. अर्वाच् अलीकडचा म्हणजे तरुण, नवा. तरुण माणसे प्रायः स्वच्छंद, उच्छृंखल, अविचारी असतात. ही समजूत समाजात सर्वत्र आढळते. म्हणून वरील अर्थच्छटा लक्षित होतात. (१. ट) मधील 'अर्वाक' पद अर्वाच्य या अर्थी आले आहे.

(२. अ) म्हणौनि अभेदाभेदु देखाति ।
अनाना नामें ठेविति ।
देवो देवी ह्मणती ।
अवाच्यातें ॥ ज्ञा. ४.६८

(२. आ) नाइकणें तें कानू चियाळी ।
न पाहाणें तें दीठी चिगाळी;
अवाच्य तें तें टाळी !
जीभाचि गा ॥ ज्ञा. १४.२०७.

(२. ट) किंबहुना गोरगरिबापासोन सरकारकूनपर्यंत समग्री संतापही पावतात. संतापलेपणे अवाच्यवाद कार्य कर्म करितात. आज्ञापत्र. २६

(२. टा) ते (भीड) स्वल्प कार्यास्तव प्रमाद करून सर्वसाधारण लोकांमध्ये अवाच्य संभाषणे अथवा चालत आले बहुमान अंतरे तोडिली तऱ्ही पुन्हा ते पाणी चढते येसें नाहीं; —आज्ञापत्र २९

(२. त) तुम्हीं जरी अवाच्य वदाल ।
तरी हा विप्र तत्काळ जाईल ॥
श्रीधर, जै. अ. ४७.११

वरील दोन्ही शब्दांतील अर्थच्छटा अर्वाच्य शब्दात कशा व कितपत दिसतात हे पाहू. 'अर्वाच्' शब्दाचा साक्षात् संकेत काल व अवस्था यांचा बोधक आहे, तर 'अवाच्य'-पद प्रायः अनौचित्यदर्शक असते.

(१)

अ. तरि माझी घरणी । अनादि तरुणी
अर्वाच्य[1] गुणीं । अविद्या पैं ॥ ज्ञा. १४.८६

क. काळाचेया मुगुटावरि ।
जयाचिए आज्ञेची चाउरी ॥
तो कीं एकादे करी । अर्वाच्यार्चे ॥
ऋ —व. ४८४

प. आमच्या रावबहादुर प्रभृति अर्वाच्य पंडितांनी आज जो मराठ्यांवर इतकी वर्षे बिचारा सारखा भाडिमार चालविला आहे.
—चि. "माला." १०५५

पा. —हा एक मोठा मुद्दा आमच्या पाश्चात्य बंधुजनांनी काढला आहे, व त्याचा अनुवाद आमचे अर्वाच्य पंडित...आजपर्यंत करीत आले आहेत.
—चि. "स्थिति" २४

फ. या नाटक मंडळ्यांस पूर्वी चांगला आश्रय असे, पण लोकांच्या अर्वाच्यपणामुळे ... यांनी नाटकमंडळ्यांस आश्रय देणे सोडले.[2]

म. ही (जनी) दासी केव्हा केव्हा फटकळपणेही आपली अनुभूती प्रकट करते. एका अभंगात तिने थोड्या अर्वाच्यपणे आपल्या 'भक्तिपंथा'चे वर्णन केले आहे.
जोशी, मधुराभक्ती, ३४६

—'वाटेल तसे (अनुचित, मनसोक्त) बोलणारी किंवा वागणारी, अमर्याद, अविचारी, उच्छृंखल-(व्यक्ती)' असा अर्थ वरील उल्लेखातून निष्पन्न होतो. अर्वाच् शब्दाच्या मुख्यार्थावरून लक्षणेने हा नवीन अर्थाचा संकेत प्राप्त झाला आहे. तरुणांच्या बंडखोर वृत्तीची, बेतालपणाची तक्रार जुनीच आहे. यौवन व अविवेक यांत प्रायः साहचर्यसंबंध असतो. समाजाचा व्यक्तिविषयक दृष्टिकोण (attitude) चित्रित झालेला दिसतो. विशेषण व्यक्तिवाचक नामाशी संबद्ध असते. गुण – आचार – विशेषाचा बोध होतो.

(२)

म. नेटकाचे वैशिष्ट्य हे की, तो प्रकार दृश्य व श्राव्य आहे. काही कुत्सित टीकाकार तो प्रकार अर्वाच्य आहे असेही म्हणतील.
पुलदे, नस्ती उठाठेव, ९८

य. आजच्या मुलांना बिघडविण्यास कारणीभूत होणाऱ्या गोष्टी म्हणजे अर्वाच्य वाङ्मय आणि अश्लील चित्रपट होत.
—केसरी २०-६-५८

---

१ अर्वाच्य – राजवाडे पाठ. 'अनिर्वाच्य' शासन प्रतीचा पाठ

२ उद्धृत—श्रीनाब.-म. रंग. इतिहास१ ४३०

या. भारताच्या चढाईखोर वर्तनाने 'आमचा केसही वाकडा होणार नाही' असे देखील (चीनने) अर्वाच्यपणाने सांगून टाकले आहे. राजनैतिक स्वरूपाच्या निवेदनात गावगुंडीतच शोभेल अशी ग्राम्य भाषा वापरणाऱ्या चीनच्या उच्च व प्राचीन संस्कृतीची काय वाखाणणी करावी?

केसरी, १०-१२-६१

—(ज्याचा उच्चारही करू नये असे) घाणेरडे, हीन, ग्राम्य, अभद्र, अश्लील, अनुचित, खोडसाळ, शिवराळ वचन[1]-भाषण वा लेखन असे अर्थ या उल्लेखांतून स्फुट होतात. 'अर्वाच्य' मधील निषेधात्मक आशय व अर्थापकर्ष या अर्थप्रकारांत उतरले आहेत.

याप्रमाणे 'अर्वाच्' आणि 'अवाच्य' या दोन शब्दांतील भावांचा – (concepts) – कल्पनांचा संकर 'अर्वाच्य' पदात झालेला वरील उल्लेखांवरून प्रतीत होतो. वर नमूद केलेल्या, ज्येष्ठांनी दाखवलेल्या दोन मार्गांचा समन्वय या शब्दाच्या साधनिकेस उपकारक आहे असे अर्थदृष्ट्या म्हणता येते.

सं. अर्वाक ↗ अर्वाच्+अवाच्य ∠ अर्वाच्य उभय संस्कृत शब्दांत भरपूर वर्णसादृश्य असल्यामुळे संभ्रमाने संपर्क (contamination) होऊन हा संयुक्त – द्विमुखी – शब्द निष्पन्न झाला आहे असे वाटते.

या दोन पदांचा जोड इतका चपखल – चेमालूम बसला की 'कषाणि भूमिका ते नेणवे' (ज्ञा. १०|४२) अशी गत झालेली दिसते.

वधू+वर 7 वोहर हा द्विमुखी शब्द जुन्या वाङ्मयांत अनेकदा आढळतो.

१ अर्वाच्य – शिव्या, आरोप, घोषणा असे प्रयोग आढळतात.

---

# ६१-६२ मधील बंगाली वाङ्मयातील प्रवाह

लेखक : विमल दत्त,
अनुवादक : शारदा देशमुख

आमच्या एका तरुण कवीने म्हटले आहे. Whether it blossoms or not, this is Spring time ... ते अलीकडील बंगाली वाङ्मयाचे खरेखुरे चित्र आहे. उजाडपणामुळे ते रुक्ष असले तरी त्यात जाणीवेचे चैतन्य आहे. आविष्कार क्वचित झाला असला तरी कालनिष्ठ वैशिष्ट्यांकडे योग्य ते लक्ष पुरविले गेले आहे. मोसम अगदी वाया गेला नाही.

सामान्य वाचकाची या कालखंडात निराशा झाली. काही नामांकित आणि लोकप्रिय लेखकांनीदेखील जणू अपेक्षाभंग करण्यासाठीच त्यांची मने आकर्षून घेतली. अलीकडच्या वाङ्मयातून जीवनोपयोगी काही निर्माण होत नाही अशी त्यावर जी निराशाजनक तीव्र टीका झाली तिचे समर्थनही होऊ लागले. पूर्वीप्रमाणेच तारा शंकर, मनोज बसु, अचिंत्य सेनगुप्ता विमल मित्र,आणि यांच्या मालिकेतील इतर लेखक कथा-कादंबऱ्या लिहीत होते. परंतु त्यांनी नियतकालिकांच्या आणि ग्रंथांच्या वाढत्या वाचकांच्या अपेक्षा पुऱ्या केल्या नाहीत.

उदाहरणार्थ, प्रसिद्ध कथालेखक बिमल मित्र यांनी चालू पिढीच्या चंचल आणि विफल मनोवस्थेचे दर्शन घडविणारी एक जाडजूड कादंबरी लिहिली तीत चालू काळातील घरामोडींचे अतिसूक्ष्म वर्णन त्यांनी केले. जणू काही इतिहास - जिज्ञासू वाचकांच्या मनात प्रजा धर्माची दहशत त्यांना निर्माण करायची होती! आणि या सर्व फाफटपसाऱ्यामुळे कादंबरीतील व्यक्तिदर्शन मात्र वरवरचे आणि जुजबी स्वरूपाचे झाले आहे. एकंदरीत, वाचकाच्या शिणलेल्या मनास आपल्या अति अपरिपक्वतेने निराश करण्यात बिमल मित्र चांगलेच यशस्वी झाले आहेत. युद्धोत्तर वाङ्मयात व्यक्तिचित्रणात अस्सलपणा आणि मनोविश्लेषणात मानसशास्त्रीय दृष्टिकोन प्रगट होऊ लागला. त्यामुळे अशा जाडजूड ग्रंथाविषयीच्या आधुनिक वाचकाच्या अपेक्षा वाढल्या आहेत. जुजबीपणाचे पराकोटीचे उदाहरण असलेल्या या कादंबरीने गेली दोन वर्षे वाचकांच्या मनात प्रक्षोभ निर्माण केला आहे. ही निर्मिती एकाकी किंवा स्वयंभू नसली तरी तशा वाङ्मयाची तपशीलवार छाननी करीत बसण्यात अर्थ नाही.

श्री. मित्र यांच्याप्रमाणे पहिल्या दर्जाचे लेखक मनोज बसु यांनी आपल्या ' बन केटे बसत् ' या कादंबरीसाठी व्यापक आणि बहुरंगी पार्श्वभूमी निवडली. मात्र ती भली मोठी पार्श्वभूमी त्यांनी विटक्या रंगांनी आणि दुर्बळ, अप्रमाणशीर आणि कल्पित व्यक्तिचित्रांनी रेखाटली. आपल्या सूक्ष्म अवलोकनांनी ज्यांनी एके काळी बंगाली वाङ्मयाचा दर्जा वाढविला त्या शैलजानंदांनीही 'जनता एक्सप्रेस छेड छिलो सारखी टाकाऊ कथा आणि ' रूपं देहि धनं देहि, ' ' को ने चंदन 'सारख्या हीन दर्जाच्या कादंबऱ्या लिहिल्या. चित्रपटचाहत्यांना ज्यांच्या कलाकृतींनी अलीकडे आकर्षून घेतले त्या ताराशंकरनीही पाल्हाळिक आणि साचेबंद लघुकथा लिहून कादंबऱ्या म्हणून त्या सादर केल्या. या कादंबऱ्यांना वाङ्मयाला आवश्यक असलेल्या सत्याचा पाया नाही आणि ताराशंकरांचा एकही गुण त्यांच्यात प्रगट झाला नाही. बुधदेव बसूंनी कथा-चित्रणातील चातुर्य गमावले आणि अचिंत्य सेनगुप्तही अजाण, अश्राप, असंस्कृत जीवांच्या सलगीला दुरावले. तथापि पन्नास सालच्या आसपास परिणामकारकतेने लिहू शकणारे आणि लोकप्रिय असे काही लेखक या वाङ्मयीन अधोगतीला अपवाद ठरले. नरेन मित्र उपनगर, ( ' तिन दिन तिन रात्रि ' ) बनफूल ( ' तिन काहिनी ' ) नवेंदु घोष ' प्रथम बसन्ते ', सुबोध घोष ' छायावृता ', अन्नदा शंकर ( सुख ) इत्यादि लेखक असाधारण असे काही लिहू शकले नसले तरी ते आपल्या लिखाणाचा दर्जा सुसंगपणे कायम ठेवीत आहेत. त्यांची कल्पकता कुठल्याही प्रकारे कमी झालेली नाही. तरीही विस्तृत जगाशी त्यांचा संबंध तुटत चालल्याची चिन्हे स्पष्ट दिसत आहेत.

आमच्या अगोदरच्या वाङ्मयाचा दर्जा हा विधायक परिणामकारकतेकडे झुकणारा होता. परंतु कालौघात बदल झाला. नवीन प्रवाह वाङ्मयात शिरले. तो काळाचा अपरिहार्य परिणाम होता आणि त्या दृष्टीने वाङ्मयातील या निराशजनक विकल वातावरणाचा विचार केला पाहिजे. या काळात कार्यकारणभावांचा संघर्ष निर्माण झाला. मनामनातील गुंतागुंत वाढली. या बिकट मनःस्थितीचे वाङ्मयात वर्णन होऊ लागले. अर्थात वाङ्मयातील आकर्षकता, उथळपणा, गुंतागुंत आणि वेगवेगळ्या प्रथा या केवळ वाचकांचे मनोरंजन करण्याचे साधन बनल्या काही कथांतून सूक्ष्म आणि आश्चर्यात्मक मनोविश्लेषण केले गेल्यामुळे लेखकाचे सूक्ष्म अवलोकन दिसून आले. संघर्षाचा धागा महत्त्वाचा मानून तो त्यांनी बळकटपणे पकडला. परंतु पूर्वीच्या स्त्री - पुरुषांची ध्येयवादी कार्यक्षमता या वाङ्मयातून नाहीशी झाली. याच वेळी पूर्वीचे

अनुभवी लेखक अनैसर्गिक चित्रण अयशस्वीतेने पुन्हा पुन्हा रंगवीत आहेत. आणि अगदी तरुण लेखक अस्पष्ट अभिव्यक्तीच्या या युगात अंतर्मुखतेला आणि बाह्य भावविकलतेला प्राधान्य देत असल्यास त्यात आश्चर्य असे काहीच नाही.

निष्क्रियता हा आजच्या युगाचा धर्म नव्हे! विचार आणि आचारांची फारकत, परिणामी बोथट वचने आणि त्यांना अनुसरणारी गूढ कृती हे आजच्या युगातील नायकाचे स्वभाव-वैशिष्ट्य आहे.

संतोष कुमार घोष यांच्यापासून स्फूर्ती घेऊन आणि अचिंत्य, माणिक बानर्जी, बुधदेव आणि प्रेमेंद्र मित्र यांनी चोखाळलेल्या मार्गावरून बिमल करांसह अनेक तरुण लेखकांनी वाटचाल सुरू केली. अजूनही ते वाङ्मयाच्या भरभक्कम पायाचा शोध करीत आहेत. मनाच्या हालचालीची नव्हे विकलावस्थेची मीमांसा करावयाची आहे. मनाची ही अवस्था लघुकथांच्या द्वारे स्पष्ट करणे सोपे झाले असते. मुद्दाम निर्देश करण्याजोग्या 'दुपुर घडिये चिकेल' आणि 'नतुन स्वाद' या दोन कादंबऱ्या गत वर्षी स्वराज बानर्जी यांनी लिहिल्या. आणि 'बॉला उपन्यासेर कालान्तर' या आपल्या ग्रंथात आधुनिक बंगाली कादंबरींचे मूल्यमापन करण्याचे बहुमोल कार्य केले. त्यात विवेचनाचा समारोप करताना त्यांनी अशी शंका व्यक्त केली आहे— "नैराश्यजनक, असा हा वर्तमानकाळ पुढे कोणता आकार घेईल हे कोणालाच सांगता येणार नाही." मला असे वाटते की अलीकडील वाङ्मय-प्रयोगातील अपयश आणि गोंधळ मनाला लावून घेऊन त्यांनी ही शंका व्यक्त केली असावी. तसे म्हणताना वाङ्मयातील सूक्ष्म पण महत्त्वाचे यश त्यांनी दृष्टिआड केलेले दिसते. एका छोट्या कादंबरीनेही त्यांच्या शंकेचे निरसन होईल!

नव लेखकांतील प्रभावी आणि सहानुभूतिपूर्ण लेखन करणाऱ्या मोती नंदी यांनी आपल्या 'नक्षत्रेर रात' या लहानशा कादंबरीत ते सिद्ध केले आहे. गेल्या दशकात विचार व आचार यांतील विरोधाचे सखोल आणि अस्सल आविष्कार झाले यात शंका नाही. अचिंत्य, बुधदेव, संतोष घोष या पूर्वीच्या लेखकांनी ज्या शैलीद्वारे यशस्वी लेखन केले त्यांची ती आदर्श शैली मोती नंदी यांनी आपल्या कादंबरीत स्वीकारली. बिमल कर, रामपद चौधुरी आणि इतर तरुण लेखकांनी याच शैलीला अनुसरून वाङ्मयाला दिखाऊपणापासून मुक्त केले. मोती नंदींनी अवघ्या १५० पानांच्या आपल्या 'नक्षत्रेर रात' या छोट्या कादंबरीत या कालखंडाचे दुःख जितक्या पूर्णतेने आणि वैविध्याने रंगविले त्याच्या शतांशानेदेखील बिमल मित्र यांना आपल्या २००० पानांच्या 'कडी दिये किनलाम' या भल्या मोठ्या कादंबरीत रंगविता आले नाही.

या संदर्भात बिमल कर यांच्या 'देवाल' या कादंबरीचा मुद्दाम उल्लेख करावयास हवा. कारण या कादंबरीतील नायकाने युद्धकाळातील आणि युद्धोत्तर काळातील जीवन पाहिले आहे, त्याचे पृथक्करण केले आहे. बिमल मित्र यांनी १९ व्या शतकाला शोभून दिसल्या असत्या अशा कृत्रिमपणे लादलेल्या नीतिकल्पना २० व्या शतकाच्या मध्यातील नायकांच्याद्वारे आविष्कृत केल्या पण बिमल कर यांनी रंगविलेल्या विषण्ण वास्तवाचा कणदेखील बिमल मित्र यांना रंगविता आला नाही. माणिक बॅनर्जी आणि जगदीश गुप्त यांची परंपरा पुढे चालवून मोती नंदींनी बिमल कर यांचे अनुसरण केले. आधुनिक काळातील गुंतागुंतीची, मुक्त पण झगडणारी मने रंगविली. तथापि त्या वर्णनात निराशेतील अतिरिक्तपणा किंवा अति अद्‌भुतरम्यता नाही. त्या क्षुद्रतेतून बाह्यात्कारी कठोर भासणाऱ्या जीवनातील भावकोमलताच प्रत्ययास येते. या ठिकाणी मोती नंदींची अवस्था अचानक भेटलेल्या लहरी स्वच्छंदी

मुलांवर धड वात्सल्याचा वर्षाव न करता येणाऱ्या किंवा वात्सल्यभावना अजिबात दडपून न टाकू शकणाऱ्या आईसारखी झाली आहे.

आपल्या पहिल्या 'वृहन्नला' या कादंबरीच्या योगाने श्यामल गंगोपाध्याय यांनी वाङ्मय क्षेत्रात अलीकडेच पदन्यास केला. आकलनशक्ती आणि अनुभव यांमुळे त्यांची लेखणी वाङ्मयात कायमचा ठसा उमटवू शकेल.

आधुनिक प्रायोगिक परंपरेचे किंवा जुन्या परंपरेचेही प्रतिनिधित्व न करणारे रामपद चौधुरी आणि समरेश बसु यांचा मी अद्याप उल्लेख केला नाही. सुरवातीपासून त्यांनी आपल्या वैशिष्ट्यपूर्ण शैलीने आणि सूक्ष्म अवलोकनाने बंगाली कथा–कादंबरी-वाङ्मयात मोलाची भर घातली आहे. 'वनपलाशीर पदावली' ही रामपदांची अगदी नवी कादंबरी आहे. वैशिष्ट्यपूर्ण, प्रांजळ आणि सुबोध शैली हीच त्यांच्या अलीकडे लिहिलेल्या लघुकथांची वैशिष्ट्ये आहेत. समरेश बसु यांच्या 'छिन्नबाधा', 'देवाल लिपि' आणि 'अचिनपुरेर कथकथा' या कादंबऱ्यांतूनही त्यांची जीवनावरील अढळ श्रद्धा आणि सभोवतालच्या जगाविषयीची जाणीव यांचा प्रत्यय येतो.

गत वर्षी राहुल सांकृत्यायन आणि बारीन दास यांच्या 'अग्नि स्वाक्षर' आणि 'बहादुरशार समाधी' या दोन अगदी वेगळ्या आणि चित्तवेधक लिखाणांनी आमच्या वाङ्मयात नवी भर टाकली.

वर्तमानपत्रात प्रसिद्ध झालेले शंकुमहाराजांचे 'विगलित करुणा जान्हवी यमुना', चाणक्य सेन यांचे 'राजपथ जनपथ', गौरकिशोर घोष यांचे 'नंदाकान्त नंदाघुंटी' आणि विकर्ण यांचे 'नैमिषारण्य' इत्यादि लेखन सुंदर आणि अस्सल आहे. या चारही लेखांमुळे आमच्या भूमीचे आगळेपण दिग्दर्शित झाले एवढेच नव्हे, तर आमच्या लेखकांना एक नवे दालन खुले केले आहे.

आतापर्यंत मी आमच्या वाङ्मयातील दोन स्पष्ट आणि एक ओघाने आलेला अशा तीन प्रवाहांचा विचार केला. लघुकथांच्या संदर्भात त्यांचे विवेचन करणेही सोपे आहे.

गतवर्षी प्रेमेंद्र मित्र रामपद चौधुरी, सुबोध घोष इत्यादि लेखकांनी अनेक लघुकथा लिहिल्या. परंतु त्यांच्याविषयी बरीच चर्चा केली गेली आणि त्यांच्यावर चांगलीच मर्मभेदक टीका झाली त्या इतर लेखकांच्या कथा कथानकविरहित होत्या. मानसशास्त्राच्या दृष्टीने चुकीच्या होत्या. त्यांच्या या धाडसी प्रयत्नांमुळे मनोविश्लेषणात्मक वाङ्मयाविषयी चुकीचे ग्रह मात्र फैलावले.

संतोष घोषांच्या लेखनाने या नव्या प्रयोगाला प्रथम चालना दिली. सर्वत्र प्रसिद्ध असलेल्या 'संज्ञा प्रवाहा' च्या परंपरेचे बऱ्याच प्रयोगशील लेखकांना आकर्षण वाटले. बिमल कर यांचे सर्व लिखाण या परंपरेत बसणारे आहे. नव्या अशा कथा गोळा करून त्यांचा संग्रह त्यांनी संपादित केला आहे. या नव परंपरेच्या प्रोत्साहनार्थ त्यांनी लघुकथांच्या पुस्तिका छापण्याचा उपक्रमही सुरू केला आहे. अभिव्यक्तीतील प्रयोग हे या नव परंपरेचे वैशिष्ट्य आहे. ज्योतिरिंद्र नंदी यांच्यासारखे बरेच जुने आणि देवेश राय सारखे अगदी तरुण लेखक बिमल कर यांच्या जोडीला येऊन त्यांनी विचारवंतांचा एक मेळावा स्थापन केला आहे. त्यांचे मोठे यश स्पष्ट आहे. प्रक्षोभक आणि भरगच्च घटनांपासून आणि वास्तव जीवनाचे खरेखुरे दर्शन घडविण्याच्या आड येणाऱ्या उथळपणापासून त्यांनी लघुकथेचा बचाव केला यात शंका नाही. आत्मनिष्ठ कवींप्रमाणे त्यांच्या अंतर्मुख मनाला एक पक्का आधार सापडला आहे. त्याच्या अस्तित्वाची त्यांना जाणीव झाली आहे. मनाची जाणीव हा एक

आस आहे आणि खरे जीवन त्याभोवतीच फिरेल.

पूर्वी सांगितल्याप्रमाणे संज्ञाप्रवाहाच्या या चळवळीला अभिव्यक्तीतील अनेक प्रयोगांनी सुरवात झाली. परंतु तिच्या गतीतूनच तिला तिचा अर्थ प्राप्त झाला. त्याचा परिणाम अर्थात आशयाच्या नव्या मांडणीत दिसून आला.

केवळ एका दमात या चळवळीत भाग घेणारांची नावे सांगणे मुष्कील आहे; कारण प्रत्येकाची विचारमग्नता आणि आविष्काराची पद्धती वैयक्तिक आणि वेगळी आहे. या छोटयाशा विवेचनात त्या प्रत्येकाच्या व्यक्तिमत्त्वाची अंधुकशी ओळख करून देणेदेखलि शक्य नाही. त्यांतल्या काहींची नावे फक्त सांगता येतील. मोती नंदी, देवेश राय, बारीन गंगोपाध्याय, दीपन बॅनर्जी, शीर्षेदु मुखर्जी, अमलेंदु चक्रवर्ती, प्रवर्देंदु अधिकारी, कमलकुमार मजुमदार आणि इतर अनेकांनी या प्रभावी चळवळीत भाग घेऊन विशेषतः लघुकथेला आणि इतर वाङ्मयीन प्रकारांनाही निःसंशय आकार दिला.

दिवंगत सुधीन दत्तांच्या गतवर्षी प्रकाशित झालेल्या कवितासंग्रहाला बुधदेव बसूंनी सुंदरशी प्रस्तावना लिहिली. तीत आधुनिक कवींना मिळणाऱ्या यशाविषयी त्यांनी विश्वास व्यक्त केला आहे. विष्णु दे यांनी प्रकाशित केलेल्या 'एकालेर कविता' या पुस्तकावरूनही हेच सिद्ध होते

चाळीस सालापासून सुरू झालेल्या आणि पन्नास सालापर्यंत बंगाली कवितेत रेंगाळलेल्या अनिश्चिततेला हळूहळू सुबोधता प्राप्त होऊ लागली. कादंबरीत आणि लघुकथेत नंतर झालेल्या बदलाचे ती जणू पूर्वचिन्ह होती.

प्रेमेंद्र मित्र, अमिय चक्रवर्ती, विष्णु दे, बुधदेव, संजय, भट्टाचार्य, अरुण मित्र इत्यादि वडिलधारे आणि इतर सर्व लेखक केवळ कार्यक्षम व उत्साहीच नाहीत तर त्यांची प्रगती त्यांना स्थिरगंभीर प्रौढावस्थेकडे नेत आहे. संजय भट्टाचार्य हळूहळू एकाकी नि दुःखी होऊ लागले असले तरी भाषेचे सर्व अलंकरण सोडून देऊन त्यांची शैली विलक्षण साधी बनली आहे.

सुभाष मुखर्जी, मणीन्द्र राय, नीरेन चक्रवर्ती, वीरेन चट्टोपाध्याय, मंगलाचरण आणि राम बसु इत्यादि चाळीस साली वाङ्मयीन यश मिळविलेल्या लेखकांनी सामाजिक जबाबदारीची जाणीव अजूनही कायम ठेवली आहे. त्यांच्या मुक्त पण भावनिक वैयक्तिकतेमुळे त्यांच्या लेखनाची सार्वत्रिक चित्तवेधकता वाढली आहे. अरुण भट्टाचार्य, आलोक रंजन दासगुप्त, आलोक सरकार, शोभन सोम, मानस रायचौधुरी आणि इतर नवोदित कवी वाङ्मयातील आपले स्थान निश्चित करीत आहेत. परंतु त्यांपैकी कुणालाच नव परंपरेचा मार्गदर्शक म्हणता येणार नाही.

नव कविता आत्मविश्वासी, मुक्त, प्रामाणिक आणि विविध भावगीतात्मक आहे. मात्र तिच्यातील शब्दघडणीवर आणि कल्पकतेवर जीवनानंद दास यांचा परिणाम आहे. दुर्बोधतेविषयी वाचक कवींना दोष देत नाहीत आणि दिला तरी अधिकाधिक औत्सुक्याने ते कविता वाचतात. तीनही प्रकारच्या कवींच्या कवितेत मनाला भिडणाऱ्या भावना व्यक्त केलेल्या असतात. सुनीत, भावगीत, वर्णनात्मक कविता आणि नाट्यकाव्य हे सर्व प्रकार यशस्वी रीतीने हाताळले जात आहेत.

टागोर–शताब्दि–समारंभामुळे लोकांच्या मनात वाङ्मयाच्या कार्याविषयी जागरूकता निर्माण झाली आहे. पुस्तकांच्या आणि छापील निर्मितीच्या परिचयाविषयी त्यांच्या मनांत उत्कंठा वाढली आहे. वाचकांच्या संख्येत त्यामुळे भर पडली आहे यांत शंका नाही. पण आकर्षक आणि सुबोध वाङ्मयाबद्दल त्यांची मागणी आहे. या मागणीला सिने–रसिकांकडूनही दुजोरा मिळतो. त्यामुळे आमचे वाङ्मय असेच उत्तरोत्तर वाढत राहील अशा तऱ्हेचा आशावाद व्यक्त करण्याजोगी चिन्हे स्पष्ट दिसत आहेत.

---

# साहित्य-समीक्षा

## पाच थोर नेते—

समीक्षक
दि. के. बेडेकर

लेखक : प्र. रा. दामले,
आयडियल बुक सर्व्हिस, पुणे,
मुद्रक : लोकसंग्रह छापखाना, १९६२,
पृष्ठे ११३; किंमत २.५० रु.



तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून श्री. प्र. रा. दामले यांचा पुष्कळांना परिचय आहे. त्यांनी लिहिलेल्या या पुस्तकात एकंदर सात लेख आहेत. न्यायमूर्ती रानडे यांच्यावर दोन लेख असून चार लेख लोकमान्य टिळक, आगरकर, गोखले व गांधीजी यांच्यावर आहेत. सातवा लेख महाराष्ट्राच्या वर्तमानकालीन वैचारिक दुःस्थितीवर असून त्यात आपला वारसा व भविष्यकाळासाठी कर्तव्ये यांचा विचार केलेला आहे. या सर्व लेखांच्या मागे तत्त्वज्ञानाच्या व्यासंगाने आलेली सत्यान्वेषक भूमिका आहे. लेखाचे विषय झालेल्या थोर विभूतींच्याबद्दल अत्यंत जिव्हाळ्याची व आदराची भावना हृदयात सतत ठेवूनही तिला अंधश्रद्धेचे स्वरूप (किंवा विरूप) येऊ न देण्याची सावधानता बाळगणे आवश्यक असते. प्रा. दामले यांच्या तात्त्विक भूमिकेमुळे ते त्यांना सहज साध्य झाले आहे. त्यांची भूमिका सत्यान्वेषणाची आहे. पण त्यात पढीक तटस्थपणा नसून जीवनाशी एक सलग व जिव्हाळ्याचा संबंध राखून व्यक्तींच्या यशापयशाचे आणि मर्यादांचे विवरण त्यांनी केलेले आहे. राजकीय व सामाजिक क्षेत्रांतील नेतृत्व करणारी मोठी माणसे त्यांच्या अनुयायांना कशी वाटतात यापेक्षा एकंदर समाजाला त्यांच्या गुणदोषांचे आकलन कसे होते, कितपत यथातथ्य होते, यावर या माणसांचे टिकाऊ मोल अवलंबून असते. अशा आकलनाला उपयुक्त ठरणारे हे पुस्तक आहे.

रानडे, टिळक, आगरकर, गोखले व गांधीजी या पाच नेत्यांच्या कर्तृत्वाचे धागे एकमेकांत गुंतलेले आहेत. गुंतलेले या अर्थाने की यांपैकी प्रत्येकाच्या मोठेपणाची व्याप्ती आणि मर्यादांची कक्षा बाकीच्या व्यक्तींच्या संदर्भाने व तुलनेने कळणे सोपे जाते; एकएकट्या व्यक्तीचा मोठेपणाच फक्त कळतो व तोही खऱ्या अर्थाने कळत नाही. महाराष्ट्राच्या आणि भारताच्या राजकीय व सामाजिक जीवनाच्या पार्श्वभूमीवरच या पाच नेत्यांचे कर्तृत्व कळू शकते ही गोष्टही सहज लक्षात येणारी आहे. प्रा. दामले यांनी आपल्या चरित्र-नायकांची चित्रे रेखाटताना वरील संदर्भ, परस्परावलंबित्व आणि पार्श्वभूमी यांचे सतत भान ठेवले आहे. त्यामुळे संवादी आणि विसंवादी रंगांच्या साहाय्याने एक सलग चित्ररचना डोळ्यांपुढे धरावी तसा परिणाम या समग्र पुस्तकाच्या वाचनाने घडतो. एक आटोपशीर कालखंड घेऊन त्यातील कर्तृत्वशाली नेत्यांची चरित्रे साधनरूप मानून त्या कालखंडाचे वैचारिक चित्र सलगपणे उभे करणे ही गोष्ट अवघड आहे. तेच कार्य प्रा. दामले यांनी साधले आहे व तेही अगदी प्रांजल विवेचनाने व साध्या भाषेत वाचकाला विचारप्रवण करणारे असे झाले आहे.

या पाचही नेत्यांबद्दल प्रा. दामले यांना नितान्त आदर वाटतो व तो सर्व विवेचनात स्पष्ट व प्रांजल तऱ्हेने प्रकट होतो. त्यातून लोकमान्य टिळक यांच्याबद्दल त्यांच्या मनात विशेष भक्ती आहे. गांधीजींच्या राजकीय व

अनुक्रमणिका

आध्यात्मिक भूमिकेचा आणि यशाचा त्यांनी गौरव केलेला आहे, परंतु त्या भूमिकेच्या मर्यादा त्यांनी फार संक्षेपाने व निःसंदिग्धपणे दाखविल्या आहेत. गांधीजींचे भक्त व विरोधक या दोघांनाही त्यांचे हे विवेचन रुचणारे नाही, पथ्यकर ठरणारे आहे. न्यायमूर्तींच्या राजकीय, सामाजिक व धार्मिक विचारांचे विस्तृत आणि सखोल असे दर्शन त्यांनी प्रारंभीच्या दोन लेखांतून घडविले आहे. रानडे हे 'रावसाहेब' होते, अर्धवट ख्रिस्ती झालेले होते व स्वधर्माभिमानाला पारखे होते, मवाळ होते व इंग्रजी राज्याला ईश्वरी वरदान मानणारे होते, हे समज त्यांच्या हयातीतच बळावत गेले व आजही वृद्ध आणि तरुण सुशिक्षित माणसांच्या मनात रानड्यांची तीच विपरीत मानसमूर्ती वास करीत आहे. टिळकांनी रानड्यांच्यासंबंधी लिहिलेला मृत्युलेख लोक वाचतात, पण तो एक टिळकांच्या मनाचा मोठेपणा प्रतिबिंबित करणारा व मृत्युलेख म्हणून गौरवाचा लिहिलेला लेख मानतात. या सर्वाला कारण म्हणजे रानड्यांच्या ह्यातीत त्यांच्यावर झालेली टीका आहे असेच म्हणावे लागेल. प्रा. दामले यांनी या दृढमूल अशा विपरीत गैरसमजाचे निराकरण करणारी मीमांसा केलेली आहे व 'प्रागतिक' तत्त्वज्ञान म्हणजे काय याची योग्य कल्पना वाचकांना देण्याचा प्रयत्न केला आहे.

टिळक व आगरकर यांच्यातील संघर्षाची मीमांसा करताना प्रा. दामले यांनी लोकमान्यांच्या भूमिकेचा पाठपुरावा केला आहे. लोकमान्यांच्या सुधारणेसंबंधीच्या भूमिकेविषयी ते म्हणतात की, प्रत्यक्ष वागणुकीत ते खऱ्या समंजस सुधारकाप्रमाणे वागत आणि 'समाजजीवनाचे सातत्य न बिघडविता प्रगती' करण्यास त्यांची संमती होती. दुसरीकडे आगरकरांच्याबद्दल ते म्हणतात की, 'परंपरागत समजुतींच्या लोकांबद्दल त्यांनी कधीच असहिष्णुता दाखविली नाही.' असे जर होते तर मग सुधारणेच्या प्रश्नावर टिळक व आगरकर यांच्यात वाद माजण्याचे कारणच नव्हते! टिळक बुद्धिवादी आणि प्रत्यक्ष समाजसंघटनेचे कार्य करणारे होते, उलट आगरकर बुद्धिवादी पण भावनानिष्ठ आणि विचारप्रदर्शनालाच महत्त्व देणारे होते अशी मीमांसा करून दोघांतील प्रखर मतभेदाचे कारण हाती लागत नाही. प्रा. दामले यांनी एके ठिकाणी म्हटले आहे की, न्यायमूर्तींखेरीज बाकी सर्व नेते 'एकेरीपणाने' लढणारे होते. ते खरेही आहे. जो तो आपापल्या स्वीकृत कार्याला वाहून घेऊन स्वार्थत्यागपूर्वक, निर्भयपणे व प्रांजलपणे कार्य करीत होता; पण या एकेरीपणातून वितुष्टे, परस्पर-आघात व जनमानसावर होणारा अनिष्ट परिणाम घडला तो घडणे अटळ होते का? या प्रश्नाचे उत्तर मिळत नाही.

लोकमान्यांच्या बुद्धिवादी, स्थितप्रज्ञ अशा भूमिकेचा जो गौरव प्रा. दामले यांनी केला आहे तो मान्य होण्यासारखा आहे. परंतु रानडे, आगरकर प्रभृति प्रतिस्पर्ध्यांच्या भूमिकांचा विपर्यास आपल्या अनुयायांकडून किंवा समर्थकांकडून होत आहे असे दिसल्यावर त्यांना योग्य तो मार्ग दाखवून वाटेवर आणण्याचा खंबीरपणा लोकमान्यांनी दाखविला नाही असे म्हणणे भाग आहे. मृत्युलेखांनी हे काम होणारे नव्हते, त्यासाठी सतत डोळ्यात तेल घालून अपप्रवृत्तींना व गैरसमजांना नाहीसे करणे जरूर होते. राजकीय चळवळीकडे सर्वस्वाने लक्ष देऊनही हे करणे त्यांना शक्य होते. आज महाराष्ट्रात जी वैचारिक दुर्बलता व सर्वनिंदकपणा आला आहे त्याची बीजे 'एकेरीपणा'त आहेत, पण त्याहीपेक्षा एकेरीपणाच्या जोडीला दुसऱ्याच्या निष्ठेची कदर न करता त्याला हेटाळण्याच्या वृत्तीत आहेत. ही बीजे रानडे व आगरकर यांच्याविरुद्ध करण्यात आलेल्या अपप्रचाराच्या भूमीत रुजून वाढत गेलेली आहेत. प्रा. दामले

यांच्या मीमांसेत या दुर्दैवी घटनेची तशी स्पष्ट दखल घेतलेली नाही असे मला वाटते.

स्वधर्म व स्वदेश यांबद्दलचा दुर्दम्य स्वाभिमान व असहिष्णु दुरभिमान यांतील फरक उगवत्या राष्ट्रीय जागृतीच्या काळात लोकांना नीट समजावून सांगणे इष्ट व आवश्यक होते. तो फरक या अपप्रचारामुळे अस्पष्टच होत गेला.

महाराष्ट्राच्या आजच्या वैचारिक अवस्थेबद्दल प्रा. दामले यांचे विवेचन अप्रिय वाटणारे पण प्रांजल निवेदनामुळे परिणामकारक झालेले आहे. या संग्रहातील तो लेख वेगळ्या प्रकारचा असूनही बाकीच्या लेखांनी त्याची पार्श्वभूमी तयार झाल्यामुळे पटणारा झाला आहे. आजच्या मराठी वाचकाला हा लेख नोलाचा वाटण्यासारखा व आत्मनिरीक्षण करावयास भाग पाडणारा आहे.

या संग्रहाचे प्रकाशन योग्य वेळी होत आहे. कारण आज आपण सर्वजण युद्धाच्या सावलीत वावरत आहोत. युद्ध ही घटना माणसातील धैर्य व विजिगीषा वाढविते हे खरे; पण माणसाला माणुसकी देणारी जी विचारशीलता, सहिष्णुता व इतरांवर विश्वास व प्रेम करण्याची शक्ती ती युद्धाच्या धर्गीने करपून जाते. अशाच अवस्थेत आज आपण आहोत व म्हणून आपल्या विचारांना घडविणाऱ्या नेत्यांचे सत्यान्वेषक पुण्यस्मरण अशा वेळी घडणे फार उपकारक आहे. प्रा दामले यांचे व प्रकाशकांचे म्हणूनच आपण सर्वांनी ऋणी राहिले पाहिजे.



## महाराष्ट्रांतील उत्खनने—

लेखक : डॉ. शां. भा. देव
प्रकाशक : पब्लिकेशन्स डिव्हिजन, माहिती व नभोवाणी मंत्रालय, भारत सरकार, दिल्ली
पृष्ठे : ९५; मूल्य : रु. २=५०

समीक्षक
**मधुकर श्री. माटे**



गतवर्षीच्या मार्चमध्ये कै. लाड स्मारक व्याख्यानमालेच्या वतीने डॉ. शां. भा. देव यांनी दिलेली दोन व्याख्याने या पुस्तकात ग्रथित करण्यास आली आहेत. प्रस्तावादाखल केलेल्या आपल्या भाषणात प्रा. कुलकर्णी यांनी असे म्हटले आहे की व्याख्यात्यांच्या अगदी जवळ बसून चांगले ऐकावयास सापडेल या उद्देशानेच त्यांनी अध्यक्षस्थान स्वीकारले. जवळ जवळ तशाच बुद्धीने डॉ. देव यांच्या या छोट्या पण महत्त्वपूर्ण ग्रंथाचे परीक्षण करण्याची जबाबदारी मी स्वीकारली. या पुस्तकाचे परिशीलन करण्याची संधी सापडेल हाच तो हेतू होय. ग्रंथ उघडण्यापूर्वी, या व्याख्यानमालेच्या योजकांचे म्हणजे आकाशवाणीच्या संचालकांचे आभार मानणे जरूर आहे. अप्रसिद्धी आणि क्वचित अपप्रसिद्धी यांखाली गुदमरणाऱ्या या शास्त्राला अक्षरशः मोकळ्या 'हवेवर' आणण्याचे श्रेय त्यांनी संपादन केले आहे. आणि दुसरे म्हणजे यासाठी सर्वतोपरी समर्थ असाच उद्गाता त्यांनी निवडला.

गेल्या साधारण एका तपाच्या किंवा त्याहून थोड्याशा अधिक कालामध्ये, महाराष्ट्रात जी उत्खनने झाली त्यांचे आणि त्यांतून सिद्ध झालेल्या सांस्कृतिक इतिहासाचे दर्शन घडविणे हा पुस्तकाचा मुख्य हेतु आहे. केवळ ह्याच विषयाला वाहिलेल्या नियतकालिकांशिवाय अथवा त्या त्या उत्खननांच्या अहवालाशिवाय ही माहिती कोठेच प्रसिद्धिलेली नाही. निदान

मराठीत तरी नाहीच. ही नियतकालिके व अहवाल यांचा वाचकवर्ग अगदीच मर्यादित आहे. या दृष्टीने महाराष्ट्राच्या सांस्कृतिक जीवनाच्या काही महत्त्वाच्या अंगांचे दर्शन घडविणारा हा पहिलाच मराठी ग्रंथ आहे. यांपैकी अनेक उत्खननात ग्रंथलेखकाने स्वतः मोठीच कामगिरी बजाविलेली आहे. त्यामुळे पुस्तकाला वेगळेच महत्त्व प्राप्त होते.

या ग्रंथाचे दोन भाग कल्पिलेले आहेत. पहिला भाग हा पुरातत्त्व संशोधन, त्यातील विविध तंत्रे, भारतातील या शास्त्राचे स्थान व इतिहास अशासारख्या विषयांनी व्यापिलेला आहे. अगदी प्राथमिक अवस्थांतून हे शास्त्र कसकसे प्रगत होत गेले आणि या प्रगतीमुळे त्यातील निष्कर्ष हे अधिकाधिक स्वीकार्य कसे होत गेले याची चर्चा यात आहे. अगदी अलीकडच्या काळातच इतर भौतिक शास्त्रे ही पुरातत्त्वाच्या साहाय्याला कशी येत आहेत, उत्खननातून निघणाऱ्या वस्तूंचा अन्वयार्थ लावण्याच्या नव्या पद्धती कोणत्या यासंबंधी समग्र माहिती या प्रकरणात सापडते. हे सर्व प्रकरण माहितीपरच असल्याने व त्यात अनेक फुटकळ गोष्टींचा उल्लेख येत असल्याने आपली रसिकता जागृत ठेवूनच याचे वाचन व्हावयास हवे. एरवी यातच गुरफटून पुढच्या महत्त्वाच्या भागाकडे थोडेसे दुर्लक्ष होण्याचा संभव आहे. तथापि हेही खरे आहे की नमनाचा हा प्रपंच केल्याखेरीज लेखकाला आपले मुख्य म्हणणे योग्य तऱ्हेने समजावून देणे शक्य झाले नसते. कारण, महाराष्ट्राची कथा ही भारतीय पार्श्वभूमीवर पाहिल्याखेरीज तिचे मर्म ध्यानी येणार नाही हे लेखकाचे विधान सर्वार्थाने सत्य आहे.

दुसऱ्या प्रकरणात, वेगवेगळ्या जलौघांच्या तीरांच्या तपासणीतून आणि अनेक प्राचीन अवशेषांच्या ढिगाऱ्यातून निवडून टिपून काढलेली हकीकत आहे. कोल्हापूर, नाशिक, नेवासे, बहाळ अशासारख्या अनेक ठिकाणी आजवर झालेल्या उत्खननात काय काय अवशेष सापडले याचे सविस्तर वर्णन देऊन त्यावरून झालेली इतिहासनिर्मिती खुलासेवार सांगितलेली आहे. अश्मयुगापासून ते तहत मध्ययुगाच्या आरंभापर्यंत सर्व काळाचा आढावा यात आहे. शेवटच्या काही परिच्छेदांत संशोधन कोणत्या मार्गाने करता येण्यासारखे आहे, व कोणत्या प्रश्नांची उकल व्हावयास हवी ह्याची चर्चा आहे. त्यात ताम्रयुगीनांची स्थलांतरे, व विस्तृत उत्खनने यांवर भर देण्यात आलेला आहे. याच संदर्भात, लेखकाने महाराष्ट्रातील उत्खननात आढळून आलेल्या गुप्तकाल ते यादवकाल या कालखंडातील अवशेषांच्या अनुपस्थितीचा केवळ उल्लेख करण्याऐवजी त्याची कारणमीमांसा केली असती तर जास्त उद्बोधक ठरले असते. परंतु असे एकदोन वादाचे मुद्दे वगळले गेले असले तरी या प्रकरणाची किंमत त्यामुळे यत्किंचितही कमी होत नाही.

या पुस्तकातील दोन गोष्टींचा निर्देश करणे अगत्याचे आहे. पहिला असा की इंग्रजीचे रूपांतर करताना सुटसुटीत वाक्यरचना आणि योग्य प्रतिशब्द यांकडे अधिक लक्ष द्यावयास हवे होते. लेखकास स्वतःस याची जाणीव असावी असे वाटते. येथे उल्लेख येवढ्यासाठीच की यापुढे लेखन करणारांच्या ध्यानी ही गोष्ट आवर्जून यावी. दुसऱ्या गोष्टीबद्दल प्रकाशकांनी अधिक काळजी घ्यावयास पाहिजे होती. पुस्तकातील चित्रे व छायाचित्रे ही इतक्या लहान आकारात छापलेली आहेत की ती छापण्याचा उद्देश सफल होणार नाही असे वाटते.

पुरातत्त्व व उत्खननशास्त्र या संबंधाचा पहिला शास्त्रीय असा मराठी ग्रंथ म्हणून डॉ देव यांच्या या पुस्तकास मानाचे स्थान आहे.



# संस्कृत नाट्य–सौंदर्य —

समीक्षक
ग. वा. पळसुले

लेखक : डॉ. के ना. वाटवे,
प्रकाशक : रा. ज. देशमुख,
७३९ बुधवार, पुणे २.

पृष्ठसंख्या ४१६ ( डेमी ), मूल्य, रु. १५

डॉ. के. ना. वाटवे यांच्या 'संस्कृत नाट्य – सौंदर्य' या नवीन ग्रंथात भासाचे 'स्वप्नवासवदत्त', शूद्रकाचे 'मृच्छकटिक', कालिदासाचीं तीन्ही नाटके (मालविकाग्निमित्र, विक्रमोर्वशीय, व शाकुंतल), विशाखदत्ताचे 'मुद्राराक्षस', हर्षाची 'रत्नावली', भवभूतीचे 'उत्तररामचरित' व भट्टनारायणाचे 'वेणीसंहार' अशी सात कवींची नऊ नाटके रसग्रहणाकरता घेतली असून प्रारंभी ८९ पृष्ठांची एक विवेचनात्मक विस्तृत प्रस्तावना जोडली आहे. या प्रस्तावनेत भारतीय परंपरेप्रमाणे व आधुनिक पाश्चात्य पंडितांच्या मताप्रमाणे संस्कृत नाट्याचा उद्गम, नाटक-प्रकरण-प्रहसन वगैरे रूपकांची ( नाट्यप्रकाराची ) लक्षणे व परिचय, पूर्वरंग व नांदी, प्रस्तावना व तिचे प्रकार, नाटकातील बीज, बिंदू वगैरे पाच अर्थ प्रकृती व आरंभ, यत्न वगैरे पाच अवस्था, पंच-संधी निरनिराळ्या नाट्यसूचना, निरनिराळे पात्रभेद त्यांच्या त्यांच्या दर्जाप्रमाणे त्यांनी बोलावयाच्या भाषा इत्यादि आवश्यक बाबींचे विवेचन ( पात्रांनी एकमेकांना कोणत्या संबोधनाने हाक मारावी येथपर्यन्त ), भरताचे नाट्यशास्त्र व विश्वनाथाचे साहित्यदर्पण यांच्या आधारे लेखकाने केले आहे. त्यात क्लिष्टता टाळून ते सुबोध करण्याचा लेखकाचा प्रयत्न कौतुकास्पद आहे. संस्कृत नाट्यगृह व रंगभूमी पूर्वी कशी असावी याचे सीताबेंगा व जोगिमारा या गुहांच्या अनुरोधाने केलेले वर्णन व कैलास लेण्याचा उपयोग नाट्यगृहासारखा करीत असत ही माहिती पुष्कळांना नवी वाटेल. अंकास्य व अंकावतार यांचे प्रयोजन व प्रसंग ही डॉ. वाटवे यांनी फार चांगल्या रीतीने स्पष्ट केली आहेत. 'एकीकडे' या अर्थाच्या 'जनान्तिकम्' व 'अपवार्य' अशा दोन नाट्यसूचना आहेत. त्यांच्यात नक्की फरक काय हा एक वादाचा प्रश्न आहे. प्रत्यक्षात 'अपवार्य' ही सूचना पुष्कळदा 'स्वगत' या अर्थी वापरलेली दिसते हे लेखकाने दाखवून दिले आहे. त्यात त्याचे सूक्ष्म निरीक्षण दिसते; पण येथे त्याने निर्णय मात्र काही दिलेला नाही. ( आणि साहित्यदर्पणात 'अपवार्य' हा शब्द स्वतंत्र नाट्यसूचना म्हणून आला नसून 'जनान्तिकम्'च्या लक्षणातच आला असल्यामुळे घोटाळा वाढला आहे. ) तसेच 'पताका' व 'प्रकरी' यामधला फरकही स्पष्ट झालेला नाही. 'नाटकात येणाऱ्या प्रसंगाला (Episodes) प्रकरी म्हणतात' ( पृ. २३ ) व 'प्रासंगिक कथाभागालाच पताका म्हणतात' ( पृ. २५ ); मग दोहोत नक्की फरक काय ?— पण असे एक दोन अपवाद वगळले तर एकंदरीत सुस्पष्टपणे आवश्यक ती सर्व तात्विक माहिती सामान्य वाचकाच्या आटोक्यात उत्तम प्रकारे आणून दिली गेली आहे.

संस्कृत नाटकांत शोकान्तिका हा प्रकार नाही. सर्व नाटके सुखपर्यवसायीच असली पाहिजेत असा संस्कृत नाट्यशास्त्राचा दंडक आहे. तो योग्य की अयोग्य व त्यामुळे संस्कृत नाट्याची हानी झाली आहे काय, हा प्रश्न वेगळा. पण संस्कृत नाट्यशास्त्रकारांनी हा नियम का केला असावा याचे भारतीय तत्त्वज्ञानाच्या व जीविताचे अंतिम पर्यवसान मंगलच होणार आहे, या भारतीयांच्या श्रद्धेच्या संदर्भात लेखकाने केलेले विवेचन वाचण्या-

सारखे आहे. प्रस्तावनेतील दुसरा एक अवश्य वाचण्याजोगा भाग म्हणजे संस्कृत नाट्याच्या मर्यादा व त्याच्या ऱ्हासाची मीमांसा. नाट्यशास्त्रादि ग्रंथांचे संस्कृत लेखकांवर पडलेले दडपण व चाकोरीतून बाहेर पडण्याची लेखकांची असमर्थता, तंत्रविषयक नवीन प्रयोग करून पाहण्याच्या प्रवृत्तीचा अभाव, प्रणयाच्या (की कामाच्या ?) आविष्कारातील सदाभिरुचीचा अभाव, नाटकातील क्रमशः वाढत गेलेली पांडित्यपूर्णता व त्या प्रमाणात जनसमूहाशी त्याची झालेली फारकत, नवनवीन विषय कथानकाकरता न निवडता त्याच त्या चावून चिवट झालेल्या रामकथा व उदयनकथा, इत्यादि प्रकारे संस्कृत नाट्याच्या ऱ्हासाची मीमांसा डॉ. वाटवे यांनी अत्यंत सडेतोडपणे व चरचरीत भाषेत केली आहे. या संदर्भात 'शास्त्र केवळ निर्देशरूप असावे, आदेशपर होऊ नये' (पृ. ७५) व 'नाट्य सामान्य लोकांतून निघाले व पंडितापाशी येऊन निमाले' (पृ.१४) ही सूत्ररूप वाक्ये लक्षात राहण्याजोगी आहेत. डॉ. वाटव्यांनी संस्कृत नाट्याचे केवळ सौंदर्यच दाखविले नाही; त्यांनी त्याच्या मर्यादाही दाखवल्या आहेत.

मात्र एक गोष्ट लिहावीशी वाटते. ऱ्हास केवळ संस्कृत नाट्याचाच झाला नाही; प्राकृत व देशी भाषांच्या वाढीबरोबर साऱ्याच संस्कृत वाङ्मयाचा (ज्यात नाटक आलेच) ऱ्हास होऊ लागला. हा मुद्दा पाहिजे तितका स्पष्ट झालेला नाही. तसेच या संदर्भात लेखकाचे एक विधान चिंत्य वाटते. ते म्हणजे "संघर्ष हा तर नाट्याचा प्राण; आणि तो तर भारतीय जीवनात फारसा नव्हता" (पृ. ७७) यातील उत्तरार्ध. हे विधान अनवधानाने झाले नसल्यास धाष्टर्याचे वाटते. भासाच्या काळापासून (खिस्तपूर्व ३०० सुमारे) आजपर्यंत बाह्य व अंतर्गत संघर्ष भारतात कमी झालेले नाहीत. ग्रीक, शक, कुषाण व हूण यासारख्यांची आक्रमणे झाली व त्यांना परतवून लावणारे चंद्रगुप्त, खारवेल, पुष्यमित्र, यशोवर्मा यांसारखे सम्राट् येथे होऊन गेले. शंकराचार्यांनी भारतभ्रमण करून भारत हलवून सोडले व वैदिक धर्माची पुनःस्थापना केली. मुसलमानांच्या स्वाऱ्या होऊ लागल्यापासून हिंदु समाज ढवळून निघाला. अनेक सोमनाथ फुटले व लुटले गेले;पद्मिनींनी जोहार केले; शिवाजीसारखे स्वराज्यसंस्थापक होऊन गेले; गुरु गोविंदसिंह व संभाजीसारखे धर्मवीर हुतात्मे झाले; भागवत धर्मीय संतांनी धर्मजागृती केली. पण यांपैकी कोणताही नाट्यविषय होऊ शकतो हे आमच्या संस्कृत नाटककारांच्या लक्षातच आले नाही. जगन्नाथ पंडितासारखे कवी 'दिल्लीवल्लभपाणिपल्लवतले' रमण्यातच धन्यता मानू लागले. अगदी पेशवाईतील साडेतीन शहाण्यांपैकी एक जे देवाजीपंत चोरघडे त्यांनी नाटक लिहिले (पुरंजनचरितम्) तरी ते भागवतांतील कथेवरील; लाख बांगडी फुटलेला पानपताचा संग्राम काही त्यांच्या डोळ्यांपुढे आला नाही. संघर्ष होते पण ते पाहण्याची आमच्या संस्कृत नाटककारांना राष्ट्रीय दृष्टीच नव्हती. असो.

संस्कृत नाटकांच्या व्यक्तिशः रसग्रहणात त्या त्या नाटकांचे डॉ. वाटवे यांनी दाखविलेले गुणदोष सामान्यतः सर्वांना मान्य होण्याजोगे आहेत. मालविकाग्निमित्राची सुरवात हरदत्त व गणदास यांच्या भांडणापासून व्हायला हवी होती व विक्रमोर्वशीयात आयूच्या यौवराज्याभिषेकाच्या प्रसंगी इतर अप्सरांबरोबर चित्रलेखा मावशीलाही रंगभूमीवर आणायला हवे होते या त्यांच्या सूचना निःसंशय मार्मिक आहेत. धूता, पद्मावतीसारख्या उपेक्षितांकडेही त्यांनी सहृदयपणे लक्ष वेधिले आहे. कालिदास व भवभूती हे पक्के हिंदू असून शूद्रक मात्र 'कॉस्मॉपॉलिटन्' आहे या आपल्याकडे आंधळेपणाने स्वीकारलेल्या डॉ. रायडरच्या विधानाहीचे योग्य खंडन केलेले आहे. शकुंतलेच्या

गांधर्वविवाहास कण्वाने आशीर्वाद दिला असला तरी मनातून त्यालाही काहीतरी खट-कत होते हे त्यांनी कण्वाने दिलेल्या उपमेच्या आधारे मार्मिकपणे दाखविले आहे. (मात्र शाकुंतलातील कालिदासाचा संदेश सांगताना प्रेमविवाह करा पण वडीलधाऱ्या माणसांना सांगून सवरून करा हे लेखकाने काढलेले तात्पर्य 'सौंदर्याश्रित व उपभोगप्रवण अशा शारीरिक आकर्षणाची परिणती त्यागप्रधान व विशुद्ध आत्मिक प्रेमात झाल्यावाचून त्याचे साफल्य नाही' या रवीन्द्रनाथांच्या तात्पर्या-शेजारी अगदीच बाळबोध वाटते ). रत्ना-वलीस विलासी राजांच्या अंतःपुरातील एका सवडीच्या प्रणयक्रीडेहून ते जास्त महत्त्व देत नाहीत ते योग्यच आहे. भासाचा उत्तरकालीन नाटककारावरील प्रभावही डॉ. वाटव्यांनी चांगला दाखविला आहे. (भीमटाच्या 'स्वप्न-दशानन' या नाटकाच्या नावातही भासाच्या 'स्वप्नवासवदत्त' या नाटकाचा प्रभाव दिसतो. )

एकदोन ठिकाणी परस्पर विरोध वाटतो. उदाहरणार्थ, "भवभूतीची भाषा अवजड आणि पाल्हाळिक, विशाखदत्ताची पांडित्यप्रचुर आणि भट्टनारायणाची शब्दावडंबरात्मक आहे. यातील गद्य बोजड, प्रदीर्घ व नटांना न पेलणारे आहे" (पृ. ८०), "पण भवभूती, भट्टनारायण आणि विशाखदत्त यांची थोडी अवजड शैली, प्रगल्भ आणि भरदार आहे. या सर्वच मंडळींनी आपापल्यापरी संस्कृत-वाणीची अपूर्व अर्थवत्ता आणि सौंदर्य प्रकट केले आहे" (पृ. ८८), "शूद्रकाचे मृच्छकटिक हे भासाच्या चारुदत्तावरूनच लिहिले आहे" असे पृ. ९५ वर चकारयुक्त विधान आहे; पण "भासाच्या चारुदत्ताचा मृच्छकटिकास काही उपयोग झाला आहे की नाही हे सांगता येत नाही" असे पृ. १४८ वर म्हटले आहे. वेणीसंहारात द्रौपदीची मोकळी सोडलेली वेणी प्रतिज्ञापूर्तीनंतर भीम घालतो या भट्टनारा-यणाच्या नवीन कल्पनेविषयी "या नवीन कल्पनेने युद्धघटनांचा व या नाटकाच्या सहा अंकांचा एकसंधीपणा मात्र उत्तम साधला आहे" असे पृ. ३९३ वर म्हटले आहे; पण पृ. ४१० वर "मुद्राराक्षसातील संविधानक-रचनेत एकसूत्रता आहे. वेणीसंहारांत मात्र ती त्या प्रमाणात साधलेली नाही" असे म्हटले आहे. अर्थात अशासारख्या प्रसंगी अगदी वाच्यार्थ न घेता लाक्षणिक अर्थ घेतल्यास विरोधपरिहार होण्यासारख्या आहे. अनंगहर्षाचे 'तापसवत्सराजचरित' यदुगिरि-यतिराज संप-त्कुमार रामानुजम् यांनी संपादन करून म्हैसूर-हून १९२९ साली प्रकाशित केले आहे.

कालिदासाचा काळ किंवा भास-समस्या या सारख्या विषयावर यात पांडित्यपूर्ण संशोधन नाही म्हणून संशोधक, अथवा 'तिरकस' किंवा 'सवन' आशयाशी चुंचाचुंची करणारे अत्याधुनिक टीकाकार या ग्रंथाविषयी काहीही म्हणोत; ज्याच्याकरता हा ग्रंथ आहे तो सुबुद्ध आणि जिज्ञासु असा सामान्य वाचक मात्र सहृदयपणे पण तितक्याच चोखंदळपणे संस्कृत नाट्यासंबंधी लिहिलेला हा एक संदर्भकोश च आपल्या हाती दिल्याबद्दल डॉ. वाटव्यांना धन्यवादच देईल.



## अंतर—

समीक्षक
**हे. वि. इनामदार**

लेखक : श्री. बलराम नांगरे,
प्रकाशक : श्री. गं. रा. पाठक,
३ (जुना) सदाशिव, पुणे २.
पृष्ठे १२०, मूल्य रु. ३



श्री. गं. रा. पाठक ऊर्फ 'बलराम नांगरे' यांच्या कथांचा हा पहिलाच संग्रह आहे. यातील सात कथांपैकी चार कथा दहा वर्षांपूर्वी नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या असून तीन कथा मात्र नवीन आहेत. यांपैकी पहिल्या कथेचे 'अंतर' हे नाव त्यांनी प्रस्तुत संग्रहाला दिले आहे. आजच्या सामाजिक विषमतेमुळे 'राबणारा' आणि 'राबविणारा' असे दोन वर्ग निर्माण झाले असून त्यांच्यातील परिस्थितिजन्य अंतर झपाट्याने वाढत आहे; विचारांनी आणि मनांनी हे वर्ग परस्परापासून दुरावत चालले आहेत आणि दलितांचे वाढते दुःख हेच या 'अंतरा'चे फलित आहे, असा सर्वच कथांचा एकंदरीत सूर आहे.

'जू बैसले मानेवरी—चाबूक हा पाठीवरी!' अशीच या राबणाऱ्या वर्गाची तक्रार आहे. त्यांतली काही माणसे पांढरपेशी आहेत; तर काही श्रमजीवी आहेत. 'आशीर्वाद' या कथेतला सुरेश, 'दहा अन् पाच' मधील रावरतन, 'रत्ने व रद्दी' मधील मास्तर आणि 'अमृतं ज्ञानं अमयस्य' यातील 'मी' (—स्वतः लेखक) हे सारेजण पांढरपेशा वर्गाचे प्रतिनिधी आहेत. 'अंतर'मधली म्हातारी आणि 'कित्तूचा आंगठा' या कथेतला कित्तू श्रमजीवी आहे. कष्ट उपसणाऱ्या आणि घाम गाळणाऱ्या या मंडळींना सुखासमाधानाने जगता येत नाही, ती सदैव 'चितेच्या निमत्यात' सापडलेली असतात, हे पाहून लेखकाचे अंतःकरण व्यथित होते. याच सहृदयतेने मुंबईतल्या कामगाराच्या मनातले शल्य तो व्यक्त करतो: "म्हातारे, समदे म्हनतात—आम्हो तुमचं भलं करनार!—पन आम्ही आपले फुटपाथरीचे मालक!"

आपला हा संपन्न सामाजिक आशय लेखकाने प्रभावीपणाने व्यक्त केला आहे. दैन्य आणि दारिद्र्य यांनी गांजलेल्या म्हातारीचे वर्णन करताना ते लिहितात, "एखाद्या श्रेष्ठ कलावंताची कलाकृती जिवंत व्हावी त्याप्रमाणे ती दैन्याची पुतळी रस्त्याच्या कडेला पडलेली होती." "त्यांनी गोगलगाईची खोड काढली असती तर तिनेसुद्धा त्यांना आपल्या शिंगावरून फेकून दिले असते" या शब्दांत रावरतनचा मवाळ स्वभाव ते स्पष्ट करतात. प्राणापलीकडे जपलेली पुस्तके रद्दीत घालताना मास्तरांना झालेले दुःख त्यांनी पुढील शब्दांत व्यक्त केले आहे: "त्यांच्या मनातले संगमरवरी वाटणारे कापराचे मंदिर जळून भस्म झाले!"

एरवी प्रसन्न असलेली पाठकांची शैली काही स्थळी कृत्रिम व अनाकर्षक रूपही धारण करते; आणि मग, "त्यांनी कष्टावर कष्ट करून भाकरीवर भाकरी मिळवली होती," अथवा "आपण काही अगदीच सामान्यातल 'सा' नाही, तर मध्यमातले 'म' आहोत असा विचार त्यांच्या मनात आला" अशी मुलखावेगळी वाक्यरचना ते करतात; आणि "ती 'फुरताईने' बोलली" अशी अरूढ शब्दयोजनाही ते करतात. "अमेरिकन 'मायलव्ह' (मायलो)ची भाकरी", "पैशाची 'पैशाची' (—पिशाचतुल्य) दुनिया", "कामाचा दिवस किंवा दिवसाचे काम"—अशा सुमार कोट्या करण्याचा मोहही त्यांना आवरता येत नाही. "लोक बुडापासून ओरडत होते", "तिच्या वक्षस्थळांचा उठाव त्याला लहान राहुट्याप्रमाणे वाटला" वगैरे विधानांतील अनौचित्य तर सुस्पष्टच आहे. 'गोष्टी' (—गोष्टी, पृ. २), 'चोर परिणाम' (— घोर परिणाम, पृ. ८७) 'वीज किवा' (— वीज दिवा, पृ. १०८) यासारखे ढोबळ मुद्रणदोष पुस्तकात राहिले.

पाठकांच्या कथाकथनात एक मोठा दोष आणि एक मोठा गुण आहे. त्यांच्या कथांत वृत्तपत्रवजा निवेदन अधिक आहे, ही त्यांच्या कथेची मर्यादा होय; तर त्यांच्या अंतरीच्या कळवळ्यातून त्यांची कथा न्हाऊन निघाली आहे, या वैशिष्ट्यातच त्यांच्या कथेचे खरे वैभव सामावलेले आहे.



## लोकहितवादींची शतपत्रे—

समीक्षक
हे वि. इनामदार

संपादक : डॉ. ना. र. इनामदार
कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे २.
पृष्ठे ३८१, मूल्य रु. १०



आधुनिक महाराष्ट्राच्या राजकीय आणि सामाजिक विचारांच्या इतिहासात कै. गोपाळ हरी देशमुख ऊर्फ लोकहितवादी यांच्या 'शतपत्रां'चे स्वतंत्र आणि असाधारण स्थान आहे. श्री. श्री. रा. टिकेकर यांनी संपादित केलेली 'शतपत्रे' १९४० साली प्रसिद्ध झाली होती; पण ती आवृत्ती अलीकडे दुर्मिळ झाली होती. ती गरज ध्यानात घेऊन, पुणे विद्यापीठाच्या राज्यशास्त्र विभागातील व्याख्याते डॉ. ना. र. इनामदार यांनी शतपत्रांचा साक्षेपाने अभ्यास केला आणि लोकहितवादींचे जीवनचरित्र आणि कार्य यांची ओळख करून देणारी विवेचक प्रस्तावना लिहून शतपत्रांचे संपादन केले, 'कॉन्टिनेंटल प्रकाशना'चे श्री. अनंतराव कुलकर्णी यांनी या ग्रंथाचे प्रकाशन केले.

'शतपत्रां'च्या या दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना, अनुक्रमणिका, सूची वगैरे गोष्टी वरवर पाहिल्या तरी काही बरेवाईट बाह्यविशेष सहजपणे ध्यानात येतात. विद्या, ब्राह्मण, नेटिव अमलदार, राजकीय विचार वगैरे सात विषय ध्यानात घेऊन संपादकाने या पत्रांचे सुव्यवस्थित वर्गीकरण केले आहे व त्या क्रमाने पत्रे छापली आहेत. त्याशिवाय पत्रांचा मूळ क्रम व या आवृत्तीतील त्या पत्रांचे पृष्ठांक शेवटी देऊन जिज्ञासू वाचकांची सोय केली आहे. तसेच संदर्भ-ग्रंथांचीही यादी जोडली आहे.

शेवटी छापलेली पत्रांची विषयसूची सविस्तर व सांग आहे. अनुक्रमणिकेत पत्रांतील विषय ज्या सात विभागांत दिले आहेत त्या सर्व विषयांचा समाचार प्रस्तावनेत क्रमशः घेतलेला असल्याने पत्रांचे वाचन करण्यापूर्वी त्यातील विचारधारेची चांगली ओळख होते.

संपादनात काही ढोबळ उणीवाही जाणवतात. 'शतपत्रांशिवाय', 'निबंधसंग्रह" 'ग्रामरचना', 'गुजराथ देशाचा इतिहास' अशी अनेक पुस्तके लोकहितवादींनी लिहिली आहेत. त्यांच्या या सर्व साहित्यसंपदेची तारीखवार स्वतंत्र यादी दिली असती, तर ती उपयुक्त ठरली असती. 'लोकहितवादींच्या चरित्रा'ने प्रस्तावनेला प्रारंभ झाला आहे. त्यांचे सलग व सुसूत्र चरित्र वाचायला मिळेल या अपेक्षेने पाने उलटावीत, तर उण्यापुऱ्या चार पानांत हा चरित्र-प्रपंच आटोपलेला असून त्यातही १-१॥ पान इंग्रजी उताऱ्याने अडविले आहे. त्यांच्या जीवनातील महत्त्वाच्या घटनांना प्राधान्य देऊन त्यांचा जीवनपट देणेही आवश्यक होते. दुसरे असे की, लोकहितवादींचे असे तुटपुंजे चरित्र देऊन संपादक त्यांच्या विचारसरणीकडे वळला आहे; व त्यांच्या व्यक्तित्वाची ओळख करून देण्याचे तो विसरला आहे. खरे म्हणजे, लोकहितवादींचे चरित्र, व्यक्तित्व आणि कार्य या तीन गोष्टी क्रमशः सांगून पुन्हा त्यांचे परस्परसंबंध आणि परस्परावलंबित्व त्याने विशद केले असते, तर ते विशेष उद्बोधक झाले असते.

काही विधानांची प्रस्तावनेत अकारण पुनरुक्ती झाली आहे. उदा. "ज्ञानमार्ग शुद्ध खरा, परंतु तो फारच थोड्या लोकांना आचरणात आणण्याजोगा असल्याने सामान्य जनांना कर्ममार्ग व भक्तिमार्ग चोखाळावा लागतो." (पृ. २०) आणि, "ज्ञानमार्ग सर्वांत शुद्ध मार्ग होय, परंतु तो फार थोड्यांना अनुसरण्यासारखा असल्याने कर्मकाण्ड वा भक्तिमार्ग यांचा आश्रय सामान्य जनांना घेणे भाग पडते." (पृ. २३) शिथिल वाक्यरचनेचा प्रस्तावनेत अभाव नाही. उदा., "संपदा व

ज्ञान जोपर्यंत आपली स्थिती कळली नाही तोपर्यंत प्राप्त होणार नाहीत." (पृ. १६) अथवा, "मुंबईचा पेशवाई नष्ट झाल्यावर जो पहिला गव्हर्नर झाला..." (पेशवाई नष्ट झाल्यावर जो मुंबईचा पहिला गव्हर्नर झाला...) (पृ. ३१) 'वैचारिक सामुग्री' (– सामग्री) 'लक्ष्य (लक्ष) वेधणारे विचार' असे शब्दांचे अपप्रयोगही क्वचित आढळतात.

पुस्तकाच्या बाह्यांगाबद्दल आणि लेखन-शैलीतील किरकोळ उणीवाबद्दल वाचकाचा जो थोडासा विरस होतो तो विसरून प्रस्तावनेच्या अंतरंगाकडे वळले म्हणजे मात्र बरेच समाधान वाटते. लोकहितवादींच्या विचारसंपदेचा संपादकाने सम्यक परिचय करून दिला आहे, एवढेच नव्हे तर अन्य समाजसुधारकांच्या विचारधारांशी त्यांची तुलना करून लोकहितवादींचे मोठेपण त्याने सिद्ध करून दाखविले आहे. त्यांची धर्मकल्पना सांगताना रानडे – भांडारकरांची विचारसरणी मांडून लोकहितवादींच्या धर्मविचारांची पृथगात्मता त्याने स्पष्ट केली आहे. (पृ. २२) त्यांचा उदारमतवाद वर्णिताना संपादकाला बाळशास्त्री जांभेकरांची आठवण झाली आहे (पृ. ३१), तर त्यांचे अर्थकारण मांडताना त्याने दादाभाई नौरोजी, बर्क, स्पेन्सर आदि विचारवंतांची मते विवेचिली आहेत. (पृ. ४६ –४७)

संपादकाचे अभिजात विवेचन आणि मूलगामी चिंतन यांचा प्रत्यय प्रस्तावनेत अनेके ठिकाणी येतो. उदा० लोकहितवादींचे सामाजिक विचार त्यांच्या धार्मिक तत्त्वज्ञानाप्रमाणेच नीतिप्रधान मानवतेच्या कल्पनेभोवती गुंफलेले होते. (पृ. २५) "ह्या देशात इंग्रजी राज्य का आले याची निर्भीड चिकित्सा त्यांनीच प्रथम केली" (पृ. ३३), "चक्रनेमिक्रमाची उपपत्ती व दैववाद झिडकारून स्वातंत्र्य हे स्वकीयांमधील सामाजिक व्यथेमुळे नष्ट झाले हे दाखवून देणारी उपपत्ती यांचा मेळ कसा बसवावा?" (पृ. ३५) देशाच्या परिस्थितीविषयी लोकहितवादींनी केलेल्या विश्लेषणाचे संपादकाने केलेले विश्लेषणही मुळातूनच वाचण्यासारखे आहे (पृ. ३७).

लोकहितवादींच्या विचारांच्या मर्यादाही संपादकाने मर्यादशीलतेने दाखविल्या आहेत. उदा० "उत्क्रांतिवादी सिद्धान्त विशद करताना भारतीय ऐतिहासिक विकासाचे लोकहितवादींनी केलेले वर्णन तितकेसे बांधेसूद नाही." (पृ. ४१), "भांडवलशाही जमान्यात आर्थिक विषमता अनुभवास येईल याची त्यांना कल्पना नसावी." (पृ. ४३), "त्याची उदारमतवादी निष्ठा प्रत्यक्ष राजकारणाच्या भट्टीत तावून सुलाखून बाहेर पडली नाही. (पृ. ५०).

लोकहितवादींच्या कार्याचे संपादकाने केलेले मूल्यमापन समतोल आहे. उदा०, "लोकहितवादी राजकीय क्षेत्रातील कर्ते धुरीण नव्हते; ते रानड्यांच्या पूर्वीच्या पिढीतील वैचारिक नेते होते." (पृ. ४०) "ज्ञानी लोकांमध्येच लोकशाही यशस्वी होऊ शकेल, व लोकशाहीचा प्रचार ज्ञानप्रसारानुसार व्हावा, हा लोकहितवादींचा विचार मूलग्राही आहे." (पृ. ४४), "उदारमतवादाची मुहूर्तमेढ त्यांनी रोवली; न्या. रानडे यांनी वर इमारत चढविली." (पृ. ४६).

सदुसष्ट पानांच्या या प्रदीर्घ प्रस्तावनेला उदंड वाचनाची व सखोल मननाची जोड आहे. या विवेचनाचा प्रारंभी लोकहितवादीपूर्वकालीन सामाजिक परिस्थिती व धर्मजीवन यांचे सिंहावलोकन पार्श्वभूमी म्हणून दिले असते आणि प्रस्तावनेचा समारोप करताना, लोकहितवादीनंतर महाराष्ट्रात होऊन गेलेल्या समाजधुरीणांना लोकहितवादींपासून कोणत्या प्रेरणा लाभल्या, यांचा साधार ऊहापोह केला असता, तर लोकहितवादींच्या कार्यांचे हे समालोचन परिपूर्ण झाले असते.

---

## पहाट - स्वप्न—

समीक्षक
**हे. वि. इनामदार**

लेखक : श्री. अनंतराव पाटील.
प्रकाशक : श्री. दि. मा. धुमाळ.
नागपूर प्रकाशन, सीताबर्डी, नागपूर-१.
पृष्ठे १३०, मूल्य रु. ३



पुण्याच्या दैनिक 'विशाल सह्याद्री'चे संपादक श्री. अनंतराव पाटील यांच्या कथांचा 'पहाट-स्वप्न' हा पहिलाच संग्रह आहे. यातील सोळा कथांपैकी बहुतेक सर्व कथा यापूर्वी वेळोवेळी विविध नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेल्या असल्या, तरी श्री. पाटील यांच्या कथासंपदेचे प्रातिनिधिक दर्शन येथे घडत असल्यामुळे हे कथानक-संकलन महत्त्वपूर्ण आहे.

एका अनुभवी पत्रकाराचे हे कथासाहित्य आहे, या जाणिवेने वाचक उत्सुकतेने या कथांकडे वळतो खरा; पण हे पुस्तक हातावेगळे करताना त्याची फारशी अपेक्षापूर्ती होत नाही; आपल्या जीवनविषयक जिज्ञासेचे पुरेसे समाधान करण्याचे अंगभूत बळ या कथांत असल्याचे त्याला बेतानेच जाणवते.

—या अपेक्षाभंगाचे प्रमुख कारण असे की, या संग्रहातील निम्म्याअधिक गोष्टींची कथाबीजेच निःसत्त्व आहेत; आणि ज्या थोड्या कथावस्तू सधन व साभिप्राय आहेत त्या पेलण्याची व पालविण्याची कुवत कथाकाराच्या लेखणीत असल्याचा फारसा प्रत्ययही येत नाही. "लोक म्हणतात पहाटेची स्वप्ने खरी असतात" असे लेखक सांगतो. लेखकाचे प्रस्तुतचे 'पहाट-स्वप्न'च रसिकांच्या दृष्टीने 'दिवा-स्वप्न' च ठरेल, अशी भीती वाटते; कारण कथाविषय आणि कथनपद्धती या दोन्ही कसोट्यांना हा कथासंग्रह पुरेसा उतरत नाही.

या संग्रहातील पाच कथांतून पुरुषाच्या विवाहबाह्य प्रेमाच्या विविध छटा रंगविल्या आहेत. 'मी आणि भविष्य' या पहिल्याच कथेत, आगगाडीत रात्रीच्या वेळी अस्ताव्यस्तपणे झोपलेल्या कंजारभाटांच्या बायका, विशेषतः 'माझ्याच शेजारी अर्धवट झोपलेली बदामी डोळ्यांची एक षोडश वर्षा लावण्यलतिका' यांचे, 'तरुण माणसाला उल्लू बनविणारे' वर्णन लेखकाने केले आहे. 'जमाल साहेबांच्या सुंदर बेगमेच्या मखमली स्पर्शात जायबंदी झाल्याचे पहाट स्वप्न' पाचव्या कथेत लेखकाला पडले आहे. एका सहकारी युवतीच्या संबंधी स्वतःच्या बाबतीत पसरलेल्या लोकवार्तेने विव्हल झालेल्या व्यक्तीने दारूच्या नशेत केलेले आत्मकथन हा 'नशा' या कथेचा विषय आहे. स्वतःच्या बायकोच्या गैरहजेरीत नवरा वाहवत जाण्याचा कसा दाट संभव असतो आणि मोहाच्या आवर्तात तो कसा सापडतो, हे 'रुपा' या कथेचे प्रतिपाद्य आहे. 'गचाळ्या कपड्यात देखील आपल्या नवतीच्या गोलाईने कोणाचेही लक्ष वेधून घेणाऱ्या 'राधो' नामक हॉटेलमधील मोलकरणीवर फिदा झालेल्या औषधविक्रेत्याची कडू कथा 'पलायन' या मथळ्याखाली लेखकाने सांगितली आहे.

आता उरल्या अकरा कथा. यांपैकी 'आमच्या गावचा पाटील' ही सुमार विनोदी गोष्ट आणि 'चेहरा' ही गूढ वातावरणात घरंगळणारी कथा सोडली तर उरलेल्या नऊ कथांतून स्वेतर मानवतेचे दर्शन घडविण्याचा लेखकाने प्रयत्न केला आहे, असे म्हणता येईल. पोरक्या पुतण्याबद्दलची सहानुभूती ('बापूंचे दुःख') फिट्स येणाऱ्या बालविधवेचे दुःख ('वणवा'), नादान नवऱ्याला टाकून, त्याच्या घरासमोरच स्वतंत्र घर उभारणारी आणि बाणेदारपणाने वागून आपल्या मुलाला स्वतःच्या पायावर उभी करणारी राधा ('अपराजिता'), पती परांगदा झाल्यामुळे उदास झालेली द्वारका

('द्वारकेचा देव'), शेजारणीच्या मुलीबद्दलच्या अफवा खोट्या ठरल्याने पराभूत झालेली स्त्री ('उशीर'), कुत्र्याच्या बेवारशी पिलाचे दुःख ('थोन्या'), खेड्यातल्या भाऊचंदकीचे वर्णन ('खानदानी'), हेल्यांच्या टकरीचे नातवाच्या तोंडून वर्णन ऐकून आपल्या दिवंगत पुत्राच्या आठवणीने दुःखी झालेली म्हातारी ('झुंज') आणि 'कधि करशी लग्न माझे — ?' म्हणून तळमळणारी 'अविवाहिता' असे या कथांचे विषय आहेत. (एक दोन अपवाद सोडले तर—) थिल्या अभिव्यक्तीच्या कक्षेत या कथांचा आशय गवसत नाही आणि परिणामी या कथा सपशेल पडतात.

निवेदनाच्या भरात बऱ्याच कथांतून अनौचित्याचे अनेक प्रमाद घडले आहेत. वानगी म्हणून, पुढील उदाहरणे देता येतील :— "एव्हाना तिच्या उष्ण श्वासोच्छ्वासाचा मला स्पर्श होऊ लागला होता. माझे ओठ व हात शिवशिवत होते ..." (पृ. १३), "त्या मऊ बोटांच्या स्पर्शाने मी उत्तेजित झालो होतो. मी कॉटला जवळजवळ बांधल्या गेल्यासारखा झालो होतो ..." (पृ. ४३)

लेखकाची भाषाशैलीही फारशी कमावलेली नाही सैल शब्दयोजना आणि सदोष वाक्यरचना ठायी ठायी खटकते. "मी **मनोमनी** (—मनोमन) आनंदलो" (पृ. ८५), 'मी फक्त **माणसांचेच** (—पुरुषांचेच) चेहरे न्याहाळीत होतो. कुणाही स्त्रीकडे माझी नजर जात नव्हती" (पृ. १२७) "त्याने **त्याचे** (—आपले वा स्वतःचे) व्हिजिटिंग कार्ड बाहेर काढले" (पृ. १२८), असे शब्दांचे अपप्रयोग येथे आढळतात. तसेच, "त्यावर त्याने माझ्या हातातील बॅग घेऊन जमालुद्दीनसाहेब माझ्यापुढे चालू लागला." (पृ. ३६), "पण या नव्या जागेत नुसतीच **गरिबी** नव्हती, तर सर्वत्र **दारिद्र्य** होते" (पृ. ४५) अशा हास्यास्पद वाक्ययोजना तर अनेक ठिकाणी सापडतात.

ढोबळ मुद्रणदोषही असंख्य आहेत. 'पाश्चात्ताप' (पृ. २०), मांडवल (भांडवल.) (पृ. २५), 'स्वाभाव' (स्वभाव) (पृ.३९) 'ओथंबलेल्या (पृ. ४३), 'दुःखाच्मा' (दुःखाच्या) (पृ. ५७), 'वास्त्विक (वास्तविक) (पृ. ६१) अशी अनेक उदाहरणे देता येतील.

ओॲसिसप्रमाणे विरळपणे आढणारी काही सौंदर्यस्थळेही सांगण्यासारखी आहेत :—"मळकटलेले आकाश तडा गेलेल्या घड्याप्रमाणे मधूनमधून ठिबकत होते." (पृ. १५), "खिळखिळ्या झालेल्या फ्रेमसारखा शरीराचा सांगडा ढिला झाला होता." (पृ. ३२), "ती मुकी आपुलकी मला हरघडी जाणवायची." (पृ. ४१), "नवरा नसलेल्या स्त्रीचे जीवन म्हणजे रखरखीत उन्हाळा." —अशी काही सुबक वर्णने अल्पप्रमाणांत आढळतात.

अपवाद म्हणून एकदोनच परिणामकारक कथा या संग्रहात सापडतात. मोठेपणाच्या खोट्या कल्पनांच्या भरी पडून आत्मनाश करणारी खेड्यांतली माणसे आणि त्यांचे कुटुंब-चित्र 'खानदानी' या कथेत सुरेख रंगविले आहे. पण आबा पाटलाने दाखविलेल्या माणुसकीची तात्या पाटलाच्या मनावर काय प्रतिक्रिया झाली हे लेखकाने सांगितले असते, तर कथेचा शेवट अनाकर्षक झाला नसता. तसेच कै. माटे यांच्या 'सावित्री मुक्यानेच मेली !' या कथेची आठवण व्हावी; एवढे बळ 'द्वारकेचा देव' या गोष्टीत आहे, पण तिच्यात नाट्यमयतेपेक्षा निवेदनच अधिक आहे आणि तिची काव्यात्मकता तर लेखकाने हरवूनच टाकली आहे.

कथाक्षेत्रात श्री. पाटील यांची लेखणी अजून प्रयोगावस्थेत आहे, एवढेच या संग्रहाच्या संदर्भात सांगता येईल.

---

## आनंदवनभुवन—

लेखक : गो. नी. दांडेकर,
महाराष्ट्र प्रकाशन, अमरावती;
किंमत ६ रु.

समीक्षक
**मधू कुलकर्णी**



महारोग म्हणजे प्रचंड संकट, प्रचंड यातना. ओळीने सगळ्या अवयवांचा फडशा पाडणारा आणि माणसाला जन्मजात मिळालेल्या शरीराचे सौंदर्य ओंगळ करून टाकणारा एक भस्मासुर. गळलेली नाके, झडलेले हातपाय, वाहणाऱ्या जखमा, तांबूस चट्ट्यांनी विदीर्ण झालेले शरीर – खरोखरच महारोग्याचे दुःख हा एक मोठा सहानभूतीचा विषय. पण या रोगाचे जवळून दर्शन घेण्याचे धाडस कोण करणार? भयानक दुःख जवळून पाहिल्यावर कुठल्याही संवेदनाक्षम मनाला घेरी यावी. पण सुजाण वाचक अशी भोवळ यावी या अपेक्षेनेच ही कादंबरी हातात घेईल.

या कादंबरीत दोन प्रकारची माणसे आहेत. रोगाशी प्रत्यक्ष सामना करणारी, आणि त्यांच्या दुःखाने कळवळून जाऊन आपले आयुष्य त्याच्या सेवेसाठी वाहणारी. शाळा सोडून शेती करण्यासाठी परत आपल्या गावी आलेला महादेव हा या कादंबरीचा नायक. लहानपणी महारोग झालेल्या दूध – आईला तो प्याला होता. आणि एक रात्र त्या म्हातारीच्या शवाजवळ बसून त्याने महारोगाचे शरीर जवळून पाहिले होते. तेव्हापासून महादेवच्या मनात महारोगाने घर केले पुढे योगायोग असा की त्याच्याशी लग्न झालेल्या शकूला महारोग फुटतो आणि एक दिवस गव्हाची कापणी करताना करंगळी कापूनही त्याला संवेदना होत नाहीत तेव्हा त्याला आनंद होतो! आणि मग नवीन पर्व सुरू होते. मग वडवलीचे कुष्ठकेंद्र. तिथून पुन्हा काही काळ निसर्गाच्या कुशीत. नंतर तिरोड्याच्या कुष्ठाश्रम – या कुष्ठाश्रमाचेच आनंदवनभुवन हे नवे रूप – अशी या कादंबरीची वाटचाल आहे.

महारोगाच्या सामोरी हसतमुखाने जायला काळीजही तसेच महान पाहिजे. सगळे अवयव भस्मसात करणाऱ्या या भयंकर रोगाच्या सामोरी जाण्याचा महादेव असाच प्रयत्न करतो आहे. एवढे प्रचंड संकट स्वीकारत असताना माणूस किती गंभीर, किती खोल वाटला पाहिजे; पण महादेव बोलतो फार. तो या भयानक रोगाविषयी सुरवातीला उगीचच भावुक उत्सुक असल्यासारखा दिसतो. शकूही सुरवातीला अशीच भावूक वाटते. तिच्या रोगामुळे त्यांच्या शेतातील गव्हाची सोंगणी करायला मजूर येत नाहीत हे समजल्यावरही या प्रसंगाला शब्दरूप देण्याचा ती अट्टहास करते. 'माझ्यामुळं त्याना महारोग होईल अशी भीती वाटली ना त्यांना?' असे विचारते. लोकांनी नक्की काय सांगितले याबद्दल पुनः पुनः विचारते. 'त्या शेतात काम केलं तर आम्हांला झड्या रोग लागेल! कारण, झड्या रोगानं घेरलेलं माणूस तिथं वावरतंय' हे लोकांचे शब्द महादेव तिला सांगतो. 'माझंच चुकलं. तुला सांगायला नको होतं!' असे आपणच पुन्हा म्हणतो—

वडवलीच्या कुष्ठकेंद्रात सुरू झालेल्या बंडाचा, स्वातंत्र्य हा मध्यबिंदू आहे. तिथले जाचक कायदेकानू हा या बंडाचा परीघ आहे. इथला संग्राम तिथल्या रीतीरिवाजाविरुद्ध उभा केला आहे. हा धार्मिक स्वातंत्र्याचा प्रश्न कादंबरीत अनेक ठिकाणी दिसतो. (वडवलीला, तिरोड्याला, सय्यद आणि हुसेन कव्वाली म्हणतात तेव्हा). महारोग्यांच्या जीवनात तो अपरिहार्य आहे काय? मूळ विषयाच्या वाटेवर आलेला हा विषय आगंतुक वाटतो. वास्तविक महारोग्याचे रोगाचे दुःखच इतके भयंकर असते की अशा प्रश्नांकडे त्यांचे फारसे लक्ष

अनुक्रमणिका

राहणार नाही. समाज न मानणारे, धर्म हे खूळ आहे असे म्हणणारे, उतारवयात महारोगी झालेले वडवली केंद्रातले वृद्ध वकील लेखका-प्रमाणे कुणाच्याही सहानुभूतीला कारण होतील. पण त्या माणसाला कुणाची सहानुभूतीही नको आहे. बुद्धिवादाचा अपरिहार्य निष्कर्ष तो हाच. आणि म्हणूनच जीवनात कुठेही श्रद्धा नसलेला हा माणूस नक्की चुकला का ?

काही माणसे उपजतच श्रद्धा घेऊन जन्माला आलेली असतात. तशी आहेत महादेव आणि शकू. हे एकदा मानले की त्यांचे व्यक्तिचित्रण कसे सरळ वाटते. त्याच्या लहानपणी त्याच्या वडिलांनी शब्द दिला होता म्हणून शिकलासवरलेला असूनही पुन्हा मुलगी न पाहताच लग्नाला तयार होणे, लग्नानंतर बायको महारोगी आहे हे समजूनही मोठ्या मनाने तिचा स्वीकार करणे, आपल्याला तिच्याबरोबर राहता येईल या कल्पनेने आपल्यालाही महारोग व्हावा अशी इच्छा करणे, – या सगळ्या प्रसंगांनी महादेवचे व्यक्तिचित्र आकार घेते. वडवलीच्या केंद्रात गेल्यापासून मात्र दोघेही कामाला जुंपून घेतात. केवळ बोलत बसत नाहीत. उंच होण्याचा प्रयत्न करतात.

दुःख अनंत प्रकारचे असते. रोग अनेक प्रकारचे असतात. त्यांपैकी एक महारोग. पण या रोगाचे वैषम्य असे की तो रोग ज्या समाजात राहतो तो सबंध समाज आणि त्याचे नातेवाईकही त्याला दूर लोटतात. रक्ताची नातीही विसरायला लावणारा महारोग म्हणूनच एक सामाजिक पाप आहे असे अनेक वेळेला या कादंबरीत सांगितलेले आहे. आणि हे सामाजिक पाप धुऊन काढण्याचे मार्ग शोधण्यात या कादंबरीची बरीच पाने खर्च झाली आहेत. रोगावर पहिला खरा उपाय म्हणजे प्रगत औषधे. पण या रोग्यांकडे साध्या माणुसकीनेही पाहिले जात नाही हे त्याचे मोठे दुःख असते. अशा रोग्यांनाही जवळ कर-णारे भाऊ म्हणूनच उंच वाटतात कुचाळी कर-णाऱ्या समाजासमोर ताठ मनाने सगळे आप-ल्या पायावर उभे राहिले पाहिजेत ही भाऊंची नवी दृष्टी. हीच दृष्टी रोग्यांना एक नवी प्रेरणा देते. 'तसं म्हटलं तर मी नास्तिक आहे' हे भाऊंचेच शब्द. पण हे केवळ शब्दच. कुजलेल्यांना नवी प्रेरणा देणारा हा माणूस जीवनावर केवढी श्रद्धा ठेवून आहे – त्यांनी आपली बंदूक मल्ल्याला वापरायला दिली आहे. मल्ल्या हा जन्मठेप झालेला खुनी आहे. इथे मनपरिवर्तनाच्या सवंग वेडाचा आरोप या व्यक्तिचित्रावर सहज करता आला असता. पण इथे कारणमीमांसा योग्य दिली आहे. इथे सगळेच मरणाचे दर्शन घेऊन पुढे चालले आहेत. मृत्यूच्या दर्शनाने सगळे शक्य होते. मरणाच्या हातावर टाळी देताना विठू वाजंत्री ऐकतो. अभंग ऐकून बाळाच्या आठवणीने वारणाबाई बेशुद्ध पडते—

महारोगी आपल्या पायावर उभे राहू इच्छितात ही कल्पनाच विलक्षण आहे. 'रोग शरीराला झाला आहे, मनाला नाही, बुद्धीला नाही. ती ताजी टवटवीत आहे, तिच्या जोरावर, तुमच्या अंगच्या गुणावर तुम्ही स्वावलंबी झाले पाहिजे, आपण रोगी आहोत हे विसरले पाहिजे, असे भाऊंचे आवाहन आहे.' पहायला येणाऱ्या लोकांसाठी प्रार्थना नाही, येणारांनी प्रार्थनेवेळी आले पाहिजे. आम्ही कुणासाठीही थांबणार नाही. यात घृणा करणारांना खिजवायचे नाही तर हे सारे स्वतःसाठी आहे,' असा त्यांचा सूर आहे.

माणूस काही प्रमाणात आत्मकेंद्रित असल्याशिवाय त्याचा विकास शक्य नाही. विशेषतः ज्यांच्या जीवनात मृत्यु स्पर्शाच्या अंतरावरून येरझाऱ्या घालतो आहे अशा महारोग्यांच्या जीवनात आसक्ती निर्माण करण्यासाठी, त्यांना त्यांच्या अंतरंगातच वळवायचे ही दृष्टी महारोग्यांच्या जगाच्या दृष्टीने अक्षरशः नवीन आहे. माणसाने माणसाला दिलेला शाप, माणसाने माणसाला ठोकरूनच नाहीसा करण्याची कल्पना शेवटी माणसाच्या व्यवहारवादाच्या दृष्टीने बरोबरच आहे—

महारोग्यांना सामाजिक प्रतिष्ठा मिळवून देण्याची नवी दृष्टी श्री. दांडेकर यांनी या कादंबरीत मांडली असल्याने या रोगाने पछाडलेले रोगी त्यांना सतत दुवाच देत राहतील.



## इंद्रधनूचा पूल—

समीक्षक

**मो. रा. वाळंबे**

लेखिका — पिरोज आनंदकर

किर्लोस्कर प्रेस प्रकाशन, पुणे २

पृष्ठे १२७; मूल्य ४ रुपये



यौवनात पदार्पण करणाऱ्या अल्लड किशोरींच्या जीवनातील १३ ते १९ हा सहा–सात वर्षांचा काळ अत्यंत महत्त्वाचा असतो. या वेळी त्यांच्या शरीराची व मनाची वाढ झपाट्याने होत असते. अशा वेळी त्यांना विश्वासात घेऊन जबाबदारीची जाणीव व त्यांच्या अनेक गैरसमजांचे निराकरण करण्याचे अत्यंत नाजूक काम आईवडिलांनी किंवा घरातील वडीलधाऱ्या मंडळींनी अत्यंत कौशल्याने करावयास हवे. पण ही गोष्ट वाटते तितकी सोपी नाही. हे काम कै. पिरोज आनंदकर यांनी 'स्त्री' मासिकात एक लेखमाला लिहून कौशल्याने बजावले. तीच लेखमाला 'इंद्रधनूचा पूल' या नावाने किर्लोस्कर प्रेस प्रकाशनाने पुस्तकरूपाने प्रकाशित करून अनेकांना उपकृत करून ठेवले आहे.

बाल्य संपवून तारुण्यात पदार्पण करण्याचा किशोरींच्या जीवनातील १३ ते १९ हा काल म्हणजे एका अर्थाने इंद्रधनुष्यच असून 'इंद्रधनूचा पूल' हा त्यांचे गतायुष्य व भावी आयुष्य यांना जोडणारा तारुण्यनदीवरील पूल होय. हा ओलांडताना प्रत्येक किशोरीला अंतराळातून चालल्यासारखे वाटत असते. या पुलाला कठडा नाही. जरा अवधान सुटले की खालून वाहणाऱ्या विनाशाच्या प्रवाहात गटंगळ्या खाण्याची पाळी येते. अशा परिस्थितीत त्यांना धोक्याची सूचना देणारे व या कालांतील जबाबदारीची जाणीव करून देणारे एक उत्कृष्ट पुस्तक म्हणून याकडे मोठ्या अभिमानाने अंगुलिनिर्देश करावासा वाटतो.

या सव्वाशे पानांच्या पुस्तकात किशोरींना तरुण मुलांबद्दल आकर्षण का वाटते, त्यांच्या शरीरांत कोणते फेरबदल होतात, या वेळी मुलींनी कसे वागावे, बोलण्यात – वागण्यात – पोषाखात कोणती काळजी घ्यावी, दिवास्वप्ने का पडतात, सौंदर्याची व शीलाची जोपासना कशी करावी, व्रतपालनामागील हेतू कोणता, स्त्रियांचे द्रव्यार्जन किनपत श्रेयस्कर, कौमार्यावस्थेतील ध्येयवादी आयुष्याची इष्टानिष्टता वगैरे कुमारी–जीवनाशी निगडित प्रश्नांची चर्चा अत्यंत मनमोकळेपणाने व घरगुती भाषेत लेखिकेने केली आहे. वानगीदाखल दोन उदाहरणे देतो —

"किशोरी, मुलांची ही नैसर्गिक गुपितं जर तुम्हा मुलींच्या नजरेत आणून दिली नाहीत, तर नकळत तुमचा पाय अग्नीवर पडण्याचा संभव असतो. आणि मग नकळत जरी अग्नीवर पाय पडला तरी तो पोळल्यावाचून कसा राहील? पोळतात, भाजतात ते मुलींचे नाजूक पाय. म्हणून तुम्ही मुलींनी अधिक काळजीपूर्वक समाजात वागलं पाहिजे. कारण मुलींनो, निसर्ग तुमच्या बाजूचा नाही."

"मर्यादा हा स्त्रियांचा एक फार मोठा अलंकार आहे. कोणत्याही रत्नशाळेत तो विकत मिळायचा नाही ... ... साधेपणातही सौंदर्य कसं व्यक्त करता येईल याचाच विचार तुम्ही करायला शिकलं पाहिजे. आणि मग तुमच्या सौंदर्यकपाटात शीलाची साधी वस्त्रं, विचारांचा आरसा, मंजुभाषणाची ओठशलाका, प्रेमळपणाचे अंजन, व्यायामाचा स्नो, मधुस्मिताची गुलाबी पावडर, सद्वर्तनाचे दागदागिने, एवढी सामग्री असली तरी ती तुम्हांला तुमच्या भावी आयुष्यात खचित पुरून उरेल. तुमचं हे चित्र सर्वांना मोहवील. हाच तुमचा शृंगार! हेच तुमचं सौंदर्य!!"

अशा तऱ्हेचे पुस्तक प्रत्येक किशोरीच्या नजरेखालून अवश्य घालण्यासाठी ते शाळाशाळांतून ८ वी ते १० वीच्या मुलींसाठी पुरवणीवाचन म्हणून नेमण्याची शाळा चालकांनी व्यवस्था करावयास हवी; तरच लेखिकेचे व प्रकाशकांचे परिश्रम कारणी लागले असे म्हणता येईल.

# कौटुंबिक हितगुज —

समीक्षक
**मो. रा. वाळंबे**

लेखक – श्री. वा. काळे
किर्लोस्कर प्रेस प्रकाशन
स्वारगेट, पुणे २
पृष्ठे ११९, मूल्य ३ रुपये



आपला संसार सुखाचा कसा करावा याबाबत चार हिताच्या गोष्टी सांगणारी जुनी माणसे दिवसेदिवस दुर्मिळ होत चालली आहेत. पूर्वी एकत्र कुटुंबातील वडिलधारी व्यक्ती इतरांना संभाळून घेत असत व नव्या पिढीला त्यांच्या वागणुकीने नकळत सदाचरणाचे धडे मिळत. आज काळ पालटला आहे. तारुण्याच्या कैफात वडिलधाऱ्या माणसांच्या चार हिताच्या गोष्टी ऐकण्याच्या मनःस्थितीत आजचा तरुण वर्ग दिसत नाही. अशा वेळी संसारात नुकतेच पदार्पण करणाऱ्या व्यक्तींना आपला संसार सुखाचा व नेटका करण्यासाठी श्री. श्री. वा. काळे यांनी कौटुंबिक हितगुजाच्या गोष्टी 'किर्लोस्कर' मासिकात सातआठ वर्षे नेमाने सांगितल्या. त्यांतील निवडक अशा २९ गूजांचा संग्रह या पुस्तकात केला आहे.

सुसंस्कृत पतिपत्नींनी संसारात सुसंगती राखण्यासाठी कसे वागावे, कटु सत्यावर आवरण कसे घालावे, फुकट मिळणाऱ्या गोष्टी कशा टाळाव्या, आहे या प्रातीत समाधानाने कसे राहावे, संसारात स्त्रीची मिळकत सुख व समाधान निर्माण करते का, पाहुणचारात आस्था, अगत्य व योजकता कशी हवी, पतिपत्नींनी एकमेकाला कसे संभाळून घ्यावे, पडत्या काळात परिस्थिती पाहून कसे वागावे, गृहस्वास्थ्य व्यक्तीच्या व्यावसायिक उत्कर्षाला कसे प्रेरक ठरते, समाजाचे आपल्यावरील ऋण जाणून अनाथ-अपंगांचा आपल्या मिळकतीत वाटा आहे याची जाणीव ठेवून कसे वागावे, शेजार-धर्माचे पालन, योजनाबद्ध कौटुंबिकजीवन, परधर्मसहिष्णुता, कुटुंब व समाजाबद्दलचा विशाल दृष्टिकोन अशा अनेक प्रश्नांचा विचार या पुस्तकात लेखकाने अत्यंत संयमाने केला आहे. त्यात तक्रार नाही की आग्रह नाही. जो काही उपदेश आहे तोदेखील 'कान्ता-सम्मित' असाच आहे. व्यावहारिक सत्ये घरगुती उदाहरणांतून पटवून देणे हे या पुस्तकाचे वैशिष्ट्य! सुखी संसाराची गुरुकिल्ली प्रत्येक प्रकरणात आढळेल. कितीतरी अर्थगर्भ वाक्ये या पुस्तकात ठिकठिकाणी भेटतात. उदाहरणार्थ –

'तरुणतरुणींनी मधमाशीचा आदर्श ठेवावा, फुलपाखराचा ठेवू नये; पण घडते उलटेच!'

'प्रपंच हाही एक प्रकारचा व्यापार आहे; कुटुंबातील सर्व लोकांची व्यवस्था पाहणारी, त्यांचा उत्कर्ष घडवून आणणारी ती सहकारी संघटना आहे.'

'श्रम आणि काटकसर यांतूनच संपत्ती निर्माण होते.'

'सुखाचे शिखर पायवाटेनेच चढून जावे लागते. मोटारीचा रस्ता तेथपर्यंत जात नाही.'

तीन ते पाच पृष्ठे ही मर्यादा आखून घेतली असल्यामुळे प्रकरणातील आटोपशीरपणा हाही या पुस्तकाचा एक गुण होय. चारपाच अपवाद वगळल्यास प्रकरणांना दिलेले मथळे देखील सूचक असेच आहेत. गृह-सौख्याला पारखा होत चाललेल्या सुसंस्कृत समजल्या जाणाऱ्या सुशिक्षित समाजाला शर्करावगुंठित असे पाजलेले हे डोस उपकारकच ठरतील यात शंका नाही. नवपरिणीतांनाच नव्हे तर प्रत्येक कुटुंबीयाला देखील मार्गदर्शक वाटावे असेच हे पुस्तक आहे.



## मधुधारा—

समीक्षक

**वि. म. कुलकर्णी**

कवी : मा. गो. काटकर,

प्रकाशक : पं. अ. कुलकर्णी, पुणे २

किंमत अडीच रुपये



'जयजयवन्ती' या काव्यसंग्रहानंतर श्री. मा. गो. काटकर ह्यांचा हा दुसरा काव्यसंग्रह बऱ्याच वर्षांनी प्रकाशित होत आहे. पहिल्या काव्यसंग्रहात दिसून आलेले काटकर यांच्या कवित्वशक्तीचे पैलू या संग्रहात अधिक उजळ स्वरूपात प्रकट झाले आहेत. कवीचे काव्य-विश्व जीवनाच्या व निसर्गाच्या सूक्ष्म अवलोकितांनी नटलेले आहे. भाषेची एक प्रकारची भावमन्थर चाल सर्वत्रच प्रत्ययास येते.

या कविमनाचा एकूण कल जीवनाच्या सात्त्विक दर्शनाकडे विशेष आहे हे जाणवते. 'दान दे' यासारख्या कविता या दृष्टीने पाहण्याजोग्या आहेत. 'जे तुझे नाही तयाचे वेड तू सोडून दे' असे काही सांगता सांगता,
"दीप तू, जे चालती अंधारि त्यांना तेज दे।
गांजलेल्या दीन हाती तू दयेचा हात दे॥"
अशा वाचकाच्या मनाला जाग आणणाऱ्या ओळी काटकर सहज लिहून जातात. 'गजबजलेल्या मार्गाच्या' संगतीपेक्षा तृणपात्यांच्या हिरव्या मखमली वाटेचा कविमनास मोह वाटतो.

अंतरीची एक प्रकारची अनामिक व्यथा-प्रगट करणाऱ्या काही कविताही लक्ष वेधून घेतात. 'तेव्हा ये तू' या कवितेत प्रियेच्या येण्याच्या समयाचे निमित्त करून तिच्याविषयीच्या मुग्धकोमल भावनांची तार झंकारत ठेवली आहे ती हृद्य वाटते ...

> नीरवतेच्या कुशीत जेव्हा
> पेंगु लागते अवघे स्थिरचर
> तेव्हा ये तू, मधुस्वप्नासम
> शोधाया तव प्रियगीताचे
> विस्मरले जे अमोल ध्रुवपद
> माझ्या हृदयी ......

'अशाच वेळी' ही कविताही कोमल भावनांच्या आवर्तनांची साक्ष देते. केवळ निसर्ग-चित्रणाचेही या कविहृदयास आकर्षण आहे. श्रावणावरच्या अनेक कवितांतही आपली जागा सांभाळणारी 'आला श्रावण'सारखी कविता काटकरांनी लिहिली आहे तर 'संध्याकाळी'-मध्ये सायंसमयाच्या धूसर वातावरणाचे संस्मरणीय चित्र त्यांनी रेखाटून ठेवले आहे.

—सांसारिक जीवनातून टिपलेल्या काही क्षणांची प्रसन्नता काही कवितांत लहरताना दिसते. संध्याकाळी दीपदर्शनाच्या मंगल वेळी 'नित्य लक्ष्मीचे दर्शन' कसे घडते ते कवीने मार्मिकतेने वर्णिले आहे. प्रगट वा सूचित शृंगारस्पर्शी कल्पना काटकरांच्या बऱ्याच कवितांमधून केव्हा काही अवगुंठन घेऊन तर केव्हा निसर्गाच्या आडून वावरतात. अर्थात त्यांचा मर्यादशीलपणा मोहविणाराच आहे!

'पिंपळाच्या पारावर' अशासारख्या कवितेत काटकरांचे सर्व काव्यगुण एकवटले आहेत असे म्हणता येईल. मूकपणे पिंपळाला प्रदक्षिणा घालणाऱ्या निपुत्रिकेच्या मनातील आर्त इच्छा व सश्रद्धता कवीने सुरेख शब्दात साकार केली आहे. तिचा हृदयस्पर्शी शेवट पुढीलप्रमाणे आहे—

> पिंपळाच्या फांदीवर। ओळखीची ये चाहूल॥
> चिमण्या पिलांची चाले। कोटरांत किलबिल॥
> थबकते रूपवती। क्षणभर बघे वर॥
> पुन्हा करी प्रदक्षिणा। पुन्हा करी नमस्कार॥

काटकरांच्या कवितांमध्ये, काही वेळा, एकच 'कल्पना' मूळ घेऊन ती फुलविण्याची रीत आढळून येते. अशी कल्पनानिष्ठ कविता भावनेचे आंगिक बळ दर्शविण्यास मात्र केव्हा असमर्थ ठरते. 'वेडा छंद' कवितेत अनेक-

रंगी भिंगांतून कोणती दृश्ये दिसतात याचे 'वर्णन' येते तर 'पहाटवारा' या कवितेत एकामागून एक अशी निरनिराळी फुले पुढे उभी राहतात. निसर्गावर 'रूपके' योजण्याची 'रविकिरण' काळची पद्धतीही अनेक ठिकाणी दिसते. काळा खडक आणि वारा; जाई आणि जुईचे संभाषण; काळ्या डोहाच्या काठावर असलेला वड; उघडी बसलेली दुपार; वड आणि विहीर, अशी अनेक उदाहरणे देता येतील. वडाचा वृक्ष आणि वाट या दोन गोष्टी काटकरांना फार प्रिय दिसतात. अनेक कवितांतून त्या आल्या आहेत ... ... अशा स्वरूपाच्या कवितांत चमकदार ओळी मधून भेटतात; परंतु कवीच्या तीव्र अनुभूतीचा साक्षात्कार मात्र व्हावा तसा होत नाही असे म्हटले पाहिजे.

---

# पत्रव्यवहार

तीन घटना अशा आहेत की, त्यांबद्दल अनेक लेखक चुकीच्या माहितीचा प्रसार करीत असतात. कुणीतरी प्रसिद्ध माणसाने चूक करावी आणि मग ती चूकच आधारभूत व्हावी अशातला प्रकार आहे. आता माझ्या जीवनाची शाश्वती नाही, (मला ३१-१२-६२ रोजी ७२ वर्षे पुरी होतील) या भावनेने मला असे आपणांस लिहावेसे वाटते की, या तीनही घटनांबद्दल माझ्याजवळची निश्चित माहिती साहित्य परिषदेने तपासावी आणि खऱ्या घटना कशा घडल्या हे साहित्यिकांस जाहीर करावे. पुरावा मजपाशी आहे. पण तो माझ्या पश्चात उपलब्ध होणार नाही, आणि माझ्याशिवाय त्या पुराव्याची संगती कोणी लावू शकणार नाही :—

१ खाडिलकरांनी संगीत मानापमानाची घोषणा १९०९ च्या नोव्हेंबर महिन्यातच केली. 'प्रेमशोधन' नाटकाच्या तालमीशी तिचा काहीही संबंध नाही.

२ 'वधूपरीक्षा' नाटकाचा पहिला प्रयोग 'महाराष्ट्र नाटक मंडळी'ने केला नसून 'भारत नाटक मंडळी'ने केला आणि त्याची तारीख २२-२-१३ ही होती.

३ सुंदर स्त्रीपार्टी नट पोतनीस याचा खाडिलकरांच्या यशात वाटेकरी होण्याचा हक्क तादृशसुद्धा नाही.

क. लो. अ. हे वि.

ताराबाग, ए/१२, मुंबई ४ } पु. रा. लेले

---

# परिषद्वार्ता

**( चिटणीसांकडून )**

**दिनांक २३ जानेवारी १९६३ अखेर**

**माधव जूलियन स्मृतिदिन—** कै. माधव जूलियन यांचा स्मृतिदिन प्रतिवर्षीप्रमाणे दि. २९ नोव्हेंबरला परिषदेतर्फे साजरा करण्यात आला. या दिवशी सायंकाळी प्रा. श्री. के. क्षीरसागर यांचे 'माधव जूलियन व मराठी प्रेमकविता' या विषयावर व्याख्यान झाले.

**गडकरी स्मृतिदिन—** दि. २३-१-६३ रोजी कै. राम गणेश गडकरी यांचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. मुख्य वक्ते प्रा. ग. प्र. प्रधान होते व त्यांच्या भाषणाचा विषय 'गडकऱ्यांचे अंतरंग' हा होता. अध्यक्षस्थानी श्री. द. रा. गोमकाळे हे होते.

**टागोर-व्याख्यान माला—** दि. २० व २२ डिसेंबर रोजी विश्वकवी 'रवींद्रनाथ टागोर यांचे विचार आणि मानवता' या विषयावर अलाहाबाद विद्यापीठातील तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक श्री. व्ही. एस्. नरवणे यांची इंग्रजीत दोन व्याख्याने परिषदेतर्फे झाली. व्याख्यानाच्या दुसऱ्या दिवशी श्री.के.नारायण काळे अध्यक्षस्थानी होते.

**अतिथिगृह—** पुण्याला परगावाहून येणाऱ्या साहित्यिकांची राहण्याची होणारी गैरसोय ध्यानी घेऊन परिषदेने एक अतिथिगृह बांधण्याची योजना अध्यक्ष श्री. न. वि. गाडगीळ यांच्या मार्गदर्शनाखाली आखली आहे. श्री. काकासाहेब या संकल्पित गृहासाठी निधी जमविण्याची जातीने खटपट करीत आहेत. आतापावेतो अतिथिगृहासाठी पुढीलप्रमाणे देणग्या मिळाल्या. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांच्या निधीतून रु.५०००, दि दक्षिण महाराष्ट्र शुगर सिंडिकेट लि. पुणे. रु. १०००, श्री. क्ष, नागपूर रु. ५००, डॉ. चिंतामणराव देशमुख, दिल्ली रु. १००. (एकूण रु. ६६०० ). अतिथिगृहास अंदाजे ३०,००० रु. खर्च येणार आहे.

**गोवा-संमेलन—** गोमंतक साहित्य संमेलनाच्या पणजी येथे भरलेल्या अधिवेशनाला परिषदेचे अध्यक्ष श्री. न.वि. गाडगीळ गेले होते. अधिवेशनाहून आल्यानंतर दि.२८ डिसेंबर रोजी त्यांनी निमंत्रितांना संमेलनाचा वृत्तान्त सांगितला. दि. १७ जानेवारीला भरलेल्या सभेत प्रा. चंद्रकुमार डांगे यांनीही संमेलनासंबंधी श्रोत्यांना माहिती निवेदन केली. सभेचे अध्यक्ष पं. महादेवशास्त्री जोशी होते.

**शास्त्रीय परिभाषा कोश—** परिषदेच्या परिभाषा समितीने यापूर्वी वेळोवेळी प्रसिद्ध केलेल्या विविध विषयांवरील परिभाषा 'शास्त्रीय परिभाषा-कोश' या ग्रंथरूपाने नुकत्याच प्रसिद्ध झाल्या आहेत. डॉ. म. वि. आपटे व डॉ. मा. पु. जोशी यांनी कोशाच्या संपादनाचे काम केले. कोशाच्या एकूण रु. २५०० खर्चापैकी भारत सरकारच्या वैज्ञानिक व सांस्कृतिक खात्याने रु. १२५० ची देणगी दिली होती.

---

अनुक्रमणिका

# साभार स्वीकार

## कथा

१ गोखले अरविंद – मराठी कथा, १९६२ (संपादन), कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३–५०
२ दोडके गो. रा. – पूर्वस्मृति, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे; ४–००
३ पुंडलिक विद्याधर – पोपटी चौकट, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ५–५०
४ फडके ना. सी. – बावनकशी, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ५–००
५ बोराडे रा. रं. – पेरणी, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३–५०
६ माडगूळकर व्यंकटेश – वारी, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ३–५०
७ वैद्य वसंत शा. – अकल्पिता, कुलकर्णी ग्रंथागार, पुणे २; २–५०
८ शांताराम – लाटा, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे; ४–००

## कादंबरी

९ उजळंबकर कृ. मु. – गाठ हिमालयाशी आहे, विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे २; ६–००
१० देशपांडे रंगनाथ – आग्यामोहळ, ठोकळ प्रकाशन, पुणे २; १०–००
११ देसाई रणजित – स्वामी, देशमुख आणि कंपनी, पुणे २; १२–००
१२ वर्वे अच्युत – मातीचा वास, कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ५–००
१३ मांडवकर भाऊ – वंचना, सेवा प्रकाशन, अमरावती; ३–५०

## काव्य

१४ आपटीकर म. स. – धूमकेतु, सौ. कमलिनी आपटीकर, सातारा; २–००
१५ करंदीकर इंदिराबाई – प्रासंगिक गीते, सौ. इंदिराबाई करंदीकर, मुंबई १४; १–००
१६ कान्त वा. रा. – वेलांटी, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ४–५०
१७ कुलकर्णी वि म. व कुलकर्णी गो. म. – झपूर्झा (संपादन), विदर्भ मराठवाडा बुक कंपनी, पुणे २; ४–००
१८ रंगनाथ – रंगसंगीत, र. न. होनप, पुणे २; ०–३७
१९ वैद्य वसंत शा. – जलधारा – आंबेकर प्रकाशन, नांदेड; १–००

## प्रवास व ललित-गद्य

२० जोशी मा. पु. – भारत उत्तरा-खंड-दर्शन (केदार–बद्रीनाथ), डॉ. मा. पु. जोशी, पुणे २; ००–७५
२१ जोशी श्रीपाद – चिनारच्या छायेत, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे; ४–००
२२ भागवत दुर्गा – व्यासपर्व, मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ३–५०
२३ क्षीरसागर श्री. के. – वादे वादे, सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे; ५–००

अनुक्रमणिका

### चरित्रात्मक

२४ **गाडगीळ न. वि. – काही मोहरा काही मोती,** व्हीनस बुक स्टॉल, पुणे २; ७–५०

२५ **Naik D. G. – Art of Autobiography,** Vidarbha Marathavada Book Co, Poona 2; 15–00

### टीकात्मक

२६ **खापर्डे ब. ग. – साहित्याचा संसार,** पुणे विद्यापीठ, पुणे ७; २–००

२७ **गोखले पु. पां. – समर्थांचा विशद भक्तिमार्ग,** पु. पां. गोखले, कराड; ००–७५

२८ **जोग रा. श्री. – विचक्षणा,** सुविचार प्रकाशन मंडळ, नागपूर-पुणे; ४–००

२९ **तोडमल ह. कि. – अर्वाचीन मराठीतील खंडकाव्ये,** कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; १५–००

३० **देशपांडे अ. ना. व जोशी ग. वा. – साहित्यातील विवेक,** ( संपादन- कै. वा. म. जोशी यांच्या लेखाचे ), विदर्भ मराठवाडा बुक कं., पुणे २; ४–००

३१ **मराठे कृ. वा. – बालकवि,** मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १२–५०

३२ **शास्त्री शं. वा. – हे विश्वचि माझे घर** (रवींद्रनाथ ठाकुरांचे लेख), मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; १०–००

३३ **सहस्रबुद्धे शं. ना. – स. माधवराव यांचा मृत्यू** (नाट्यचिकित्सा), विदर्भ-मराठवाडा बुक कं., पुणे २; २–००

३४ **सहस्रबुद्धे पु. ग. – पराधीन सरस्वती,** कॉंटिनेंटल प्रकाशन, पुणे २; ५–००

### इतिहास–संस्कृति–भाषा

३५ **करंदीकर अ. ज. – अशोक ते कालिदास,** अ. ज. करंदीकर, ६०७ सदाशिव, पुणे २; १०–००

३६ **कालेलकर ना. गो. – भाषा आणि संस्कृती,** मौज प्रकाशन गृह, मुंबई ४; ७–५०

३७ **गुजर मा. वि. – करवीर छत्रपती घराण्याच्या इतिहासाची साधने,** भाग ५ ते ७, मा. वि. गुजर, १३२१ कसबा, पुणे २; १०–००

३८ **दिवेकर ह. रा. – आमचा महाभारतपूर्व राजकीय व सांस्कृतिक इतिहास,** पुणे विद्यापीठ, पुणे ७; १–५०

३९ **वाळिंबे रा. शं. – एकोणिसाव्या शतकातील महाराष्ट्राची सामाजिक पुनर्घटना** ( भाग पहिला १८०० ते १८४५ ), रा. शं. वाळिंबे, नारायण पेठ, पुणे २; १०–००

### इतर

४० **जोशी मा. पु. व सौ. रमाबाई जोशी – गृहस्थाश्रमामध्ये पदार्पण,** डॉ. मा. पु. जोशी, पुणे २; २–००

४१ **जोशी मा. पु. – न्यायवैद्यक आणि विषतंत्र,** डॉ. मा. पु. जोशी, पुणे २; १८–००

४२ **जोशी मा. पु. – वाग्विज्ञान** ( वाणीचा सर्व दृष्टीने विचार ), डॉ. मा. पु. जोशी, पुणे २; ३–००

४३ **रणपिसे आ. श्री. – दलितांची वृत्तपत्रे,** महाराष्ट्र बौद्ध साहित्य परिषद, मुंबई १८; १–५०

# नवीन सभासद

## तहहयात

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | प्रि. ना. ध. पाटील | पुणे | ७ | प्रा. कृ. शे. मार्डीकर | सोलापूर |
| २ | श्री. शं. वि. कुलकर्णी | ,, | ८ | श्री. यशस्विनी खाडीलकर | ,, |
| ३ | प्रा. न. चिं. जोगळेकर | ,, | ९ | डॉ. व. दि. राव | मुंबई |
| ४ | श्री. सु. के. भोसले | ,, | १० | श्री. शंकर सारडा | ,, |
| ५ | श्री. ग. दि. माडगूळकर | ,, | ११ | श्री. चं. ह. चौधरी | जळगाव |
| ६ | डॉ. प्र. मो. भणगे | ,, | | | |

## साधारण

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. जी. एस्. गांधी | पुणे | १४ | श्री. भा श्री. गंधे | पुणे |
| २ | श्री. प्रभाकर सिद्ध | ,, | १५ | श्री. ज. पे. मुथा | अहमदनगर |
| ३ | श्री. के. वा. जोशी | ,, | १६ | श्री. कृ. गं. दीक्षित | सोलापूर |
| ४ | श्री. स. के. चोडस | ,, | १७ | श्री. दि. द. कुलकर्णी | ,, |
| ५ | श्री. ज. वा. जोशी | ,, | १८ | श्री. धों. सो. कुलकर्णी | ,, |
| ६ | श्री. नी. ना. अगरवाल | ,, | १९ | श्री. व. ह. पिटके | कोल्हापूर |
| ७ | श्री. वि. ना. कुलकर्णी | ,, | २० | सौ. प्रतिभा भागवत | पळसे (पनवेल) |
| ८ | श्री. के. मो. साठे | ,, | २१ | श्री. वा. ना. बखले | फोंडा |
| ९ | प्रा. कृ. श्री. अर्जुनवाडकर | ,, | २२ | श्री. अ. बी. खडके. | वरूड |
| १० | श्री. श्री. द. कुलकर्णी | ,, | २३ | श्री. बी. बी. पाटील | चिपळूण |
| ११ | प्रा. राजनारायण मौर्य | ,, | २४ | श्री. व. के. ओक | ,, |
| १२ | सौ. शामला द्रवीड | ,, | २५ | श्री. गो. स. तारगावकर | ,, |
| १३ | श्री. म. र. साबणे | ,, | २६ | श्री. वा. ना. ठाकूर | रत्नागिरी |

महाराष्ट्र–साहित्य–परिषद

# इतर प्रकाशने

१ मराठी भाषेचा व वाङ्मयाचा इतिहास ( मानभाव अखेर )
के. वा. अ. भिडे
[ नवी सटीक आवृत्ती प्रसिद्ध होत आहे. ]

२ म. सा. परिषद् - इतिहास
द. वा. पोतदार — ३·००

३ वाङ्मयीन - वाद ( परिषद-पुरस्कृत ) — ३·००

४ वाङ्मय समालोचन ( १९४७ ) — २·००

५ गुजराती वाङ्मय समालोन ( १९५९ ) — १·००

६ हिंदी वाङ्मय समालोचन ( १९५९ ) — १·००

७ निबंधविकास ( प्राज्ञ परीक्षेकरिता ) — २·५०

८ साहित्य सुगंध ( प्रवेश परीक्षांकरिता ) — २·५०

९ सारस्वत प्रवेश ( प्रथमा परीक्षेकरिता ) — २·००

१० लेखनविषयक नियम ( मराठी साहित्य महामंडळ ) — ०·१५

चौकशी :

चिटणीस, महाराष्ट्र साहित्य परिषद

टिळक रस्ता, पुणें २ ( दूरध्वनि ५५५६१ )

मुद्रक : श्री. वि. ग. माटे, विश्वकर्मा मुद्रणालय, ३९५ टिळक रस्ता, पुणे २
प्रकाशक : श्री. वि. त्र्यं. शेटे, चिटणीस म. सा. परिषद, टिळकरस्ता, पुणे २


अनुक्रमणिका

